# नवभारत

वर्ष ५ वें ]    मार्च १९५२    [ अंक ६ वा



किंमत १ रुपया

अनुक्रमणिका











नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

# दैवी संपत् चरित्र-माला

संपादक—श्री. दा. न. शिखरे, : श्री. आपटे गुरुजी



जगाच्या इतिहासांत दोन प्रवाह स्पष्टपणें दिसतात. एक स्वार्थी, भोगवादी व हिंसाप्रधान. इतरांना जिंकून, लुबाडून, गुलाम बनवून त्यांचेवर आपली सत्ता चालवावी, अशा महत्त्वाकांक्षेचे पराक्रमी व सामर्थ्यशाली पुरुष इतिहासांत आढळतात; किंबहुना त्यांनीं चालविलेल्या लढाया, त्यांनीं केलेल्या कत्तली, त्यांनीं घडविलेले रक्तपात यांनींच इतिहासाचीं बरींचशीं पानें रंगलेलीं असतात.

पण समाजाची जी धारणा होते व मानवजातीची जी प्रगति होते, ती दुसऱ्या कोटींतील थोर लोकांकडूनच. अभय, सत्य, दया, क्षमा, शान्ति, तेज इत्यादि दैवी संपत्तीच्या विभूतीच मानवांना प्रेमाचा व ऐक्याचा मार्ग दाखवितात. स्वतःला दिसलेलें सत्य स्थापण्यासाठीं व अन्यायाचें निर्दाळण करण्यासाठीं ते मूकपणें जनतेची सेवा करीत राहतात—अवश्य तर, त्या कामीं आत्म-बलिदानहि करतात. अशा पुरुषोत्तमांची ओळख प्रचलित इतिहासांतून फारच थोडी करून दिली जाते.

ती ओळख महाराष्ट्रीय वाचकांना यथाशक्य प्रमाणांत करून द्यावी, या हेतूनें "दैवी संपत् चरित्र-माला" काढलेली आहे. पृथ्वीच्या पाठीवरील सर्व देशांतील व सर्व धर्मांतील प्रेमपूर्ण व सेवाशील स्त्री-पुरुषांच्या जीवनांतील उदात्त कथा या 'मालें'त दिल्या जातील. साधारणपणें प्रत्येक पुस्तकांत अशा आठ अहिंसक संतांचीं चरित्रें असतील व अशीं एकूण बारा पुस्तकें निघतील.

कवि श्री. बा. भ. बोरकर, 'आनंद'कर्ते श्री. गोपीनाथ तळवलकर, श्री. दे. ना. टिळक, श्री. काकासाहेब बर्वे इत्यादि लेखन-साहाय्य करणार आहेत. पहिलें पुस्तक प्रसिद्ध झालें आहे. हें शंभर पृष्ठांचें असून त्याची किंमत एक रुपया आहे.



सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला, पुणें २







अनुक्रमणिका







# वर्गणीदारांस सूचना

(१) 'नवभारत'चा अंक दरमहा १ तारखेच्या आंत नियमितपणें काळजीपूर्वक पोस्टांत टाकला जातो. वर्गणीदारांस जर आपला अंक ५ तारखेपर्यंत मिळाला नाहीं तर त्यांनीं प्रथम स्थानिक पोस्ट ऑफिसांत चौकशी करून नंतर आमचेकडे लिहावें. अंक शिल्लक असला तरच पाठविला जाईल. अंक न मिळाल्याबद्दल १० तारखेनंतर येणाऱ्या तक्रारींस उत्तर दिलें जाणार नाहीं.

(२) वर्गणीदार कोणत्याहि महिन्यापासून होतां येतें.

(३) पत्रव्यवहार करतांना नेहमीं अनुक्रम-नंबर अवश्य लिहावा. 'नवभारत' कचेरींतून दरमहा जो अंक रवाना होतो त्यावर पत्त्याच्या वरच्या बाजूस डाव्या हाताला अनुक्रम-नंबर लिहिलेला असतो.

(४) पत्ता बदलावयाचा असल्यास त्याबद्दलची सूचना कचेरीस २५ तारखेपूर्वी मिळाली पाहिजे. त्यानंतर सूचना-पत्र आल्यास त्याची अंमलबजावणी त्याच महिन्यांत न होतां पुढील महिन्यापासून केली जाईल.

(५) 'नवभारत' च्या कोणत्याहि एजंटास वर्गणी वसूल करण्याचा अधिकार नाहीं. त्यामुळें कचेरी व वर्गणीदार या दोघांनाहि त्रास होतो व विलंब लागतो. म्हणून वर्गणी नेहमीं कचेरीकडे खालील पत्त्यावर पाठविण्याची कृपा करावी.

व्यवस्थापक
**'नवभारत'**,
२९१ शनिवार, पुणें २

# जाहिरातींचे दर

| | सबंध पान | | अर्धे पान | | पाव पान | |
|---|---|---|---|---|---|---|
| एक वेळ | ७५ | | ५० | | ३५ | |
| तीन वेळां | ७० | प्रत्येक खेपेस | ४५ | प्रत्येक खेपेस | ३० | प्रत्येक खेपेस |
| सहा वेळां | ६५ | ,, | ४० | ,, | २५ | ,, |
| बारा वेळां | ६० | ,, | ३५ | ,, | २० | ,, |

पाव पानापेक्षां कमी जाहिरात स्वीकारली जात नाहीं.

| | | |
|---|---|---|
| कव्हर पान नं. ४ | प्रत्येक वेळेस | ५० रुपये |
| कव्हर पान नं. २ व ३ | ,, ,, | २० रुपये |

(१) सर्व जाहिराती 'जाहिराती व जाहिरातदार' या सदरांत छापल्या जातात.

(२) शक्य असेल त्या वेळेस जाहिरातदारांचा थोडक्यांत परिचय देण्याची पद्धत स्वीकारलेली आहे.

(३) एका पानांत दोन कॉलम्स असतात.

(४) पानाचा आकार ८॥" × ५।"

व्यवस्थापक
**'नवभारत'**
२९१ शनिवार, पुणें २

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष पांचवें | मार्च
अंक सहावा | १९५२

# नवभारत

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर-आचार्य स. ज. भागवत - श्री. हरि कृष्ण मोहनी - प्रा. वि. म. बेडेकर
का. संपादक



वार्षिक रु. ९    सहामाही रु. ५    अंकास रु. १

हें मासिक र. ग. जोशी यांनीं सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार, पुणें २, येथें छापून सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

अनुक्रमणिका







# ‘ नवभारत ’, मार्च १९५२

## लेखक-परिचय

[ या अंकांतील खालील लेखकांशिवाय इतर लेखकांचे लेख ‘ नवभारतां ’त या वर्षीं यापूर्वी आले असून त्या त्या वेळीं त्यांचा परिचय दिला आहे.—का. सं. ]

डॉ. के. ना. वाटवे एम्. ए., पीएच्. डी.— पुणें विद्यापीठांत मराठीचे प्राध्यापक. ‘ रसविमर्श ’, ‘ संस्कृत काव्याचे पंचप्राण ’ इत्यादि पुस्तकांचे लेखक.

श्री. शंकरराव देव— कॉंग्रेसचे माजी सरचिटणीस. ‘ अखिलभारतीय सर्वसेवासंघा ’चे सरचिटणीस. ‘ नवभारत ’ मासिकाचे संचालक. ‘ भगवान् बुद्धासाठीं ’, ‘ उपनिषत्सार ’ इत्यादि पुस्तकांचे लेखक.

श्री. राजा मंगळवेढेकर (दौंड)— समाजवादी पक्षाचे कार्यकर्ते. यांच्या कविता मराठी नियतकालिकांतून प्रकाशित होत असतात.

श्री. स. शं. देसाई ( पुणें )— ‘ टालस्टॉयच्या स्मृती ’ या पुस्तकाचे लेखक.

श्री. गो. वि. खासगीवाले ( मिरज )— ‘ मराठी छंदःशास्त्र ’ या पुस्तकाचे लेखक.

श्री. श्रीपाद जोशी ( पुणें )— उर्दू, हिंदी, गुजराथी साहित्याचे अनुवादक. ‘ उर्दूके अदीब ’, ‘– आणि माणसाचा मुडदा पडला ! ’, ‘ वेडा ’ इत्यादि पुस्तकांचे लेखक.

प्रा. ल. ब. हरोलीकर— पुणें येथील नौरोसजी वाडिया कॉलेजमध्यें तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक. ‘ Teaching of Civics ’, ‘ नागरिकनीति ’ या पुस्तकांचे लेखक.

श्री. इतबार अ. पठान— अमळनेर येथील प्रताप कॉलेजमध्यें बी. ए. च्या वर्गांतील विद्यार्थी.

---

* मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें, हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.

* या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याहि विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.

* मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

डॉ. के. ना. वाटवे

# 'वासवदत्ता'कार सुबन्धु

भारतीय लेखकांचें इतिहासविषयक अज्ञान किंवा उदासीनता व त्यांना आपल्या ग्रंथांत आत्मोल्लेख करूं न देणारी त्यांची शालीनता या कारणांमुळें संस्कृत कवी आणि इतर ललित लेखक यांचा परिचय करून देतां येईल इतकी विश्वसनीय व तपशीलवार माहिती अद्यापि उपलब्ध नाहीं. बाण, भवभूति, बिल्हण, मङ्ख, श्रीहर्ष इत्यादि थोडे अपवाद सोडले तर इतर कवी आपल्याबद्दल व आपल्या समकालीनांबद्दल फारसा उल्लेख करीत नाहींत. त्यामुळें त्यांच्या ग्रंथांतील अन्तर्गत पुरावा व कांहीं बाह्य प्रमाणें यांवरच सगळी भिस्त ठेवून कांहीं त्रोटक माहिती मिळविणें आणि कांहीं अंदाज बांधणें यापेक्षां दुसरें कांहीं करणें संशोधकांना शक्य झालेलें नाहीं. अशा स्थितींत एकादा कवि कोठें होता? केव्हां होता? त्याची वैयक्तिक व तत्कालीन परिस्थिति कशी होती? इत्यादि प्रकारची वाचकाची जिज्ञासा अतृप्तच राहते. फार झालें तर कांहीं त्रुटित व आनुमानिक माहितीच्या पांचट ताकावरच समग्र व खऱ्या हकीगतीच्या दुधाची तहान भागवावी लागते! हीच अवस्था सुबन्धूबद्दलची आहे.

## सुबन्धूचा काल

सुबन्धूनें आपल्याबद्दल 'वासवदत्ते'त केलेला उल्लेख पुढीलप्रमाणें आहे : "सरस्वतीनें दिलेल्या वरामुळें ज्या ('वासवदत्ता' नांवाच्या) प्रबंधांत प्रत्येक अक्षरावर श्लेषमय रचनेचें कौशल्य प्रगट झालें आहे, तो प्रबंध सर्व सुजनांचा बांधव असा सुबन्धु यानें रचिला." [1] सुबन्धूनें केलेला दुसरा उल्लेख कोणा एका विक्रमादित्याबद्दल [2] आहे. या श्लोकांत सुबन्धूनें विक्रमादित्याच्या निधनानंतर विद्या आणि राज्यव्यवस्था यांमध्यें झालेलें अराजक वर्णिलें आहे; पण हा विक्रमादित्य कोणता, याचा कांहींच तपशील तेथें नसल्यानें हा उल्लेख निर्णायक नाहीं. 'विक्रमादित्य' हें खिस्तशकपूर्व पहिल्या विक्रमाचें नांव इतकें प्रसिद्ध व विलोभनीय झालें कीं, कोणाहि पराक्रमी व विद्या-कलांच्या पुरस्कर्त्या भारतीय राजाला तें नांव आपल्याला लावून घेण्यांत मोठें भूषण वाटूं लागलें. त्यामुळें मूळचें विशेषनाम असलेलें हें पद सामान्यनाम बनून उपपद झालें. असें उपपद धारण करणारे जे पांच-सहा विक्रमादित्य झाले त्यांतल्या पहिल्याच, किंवा फार झालें तर दुसऱ्या विक्रमादित्याचा म्हणजे द्वितीय चन्द्रगुप्ताचा (इ. स. ३८०-४१३) उल्लेख सुबन्धूनें केला असल्याचा संभव दिसतो व तो उल्लेखहि त्यानें 'आपण त्याचे समकालीन आहों' अशा दृष्टीनें केलेला नसून 'भूतकालांतील एक शोचनीय घटना आपण सांगत

---

प्रस्तुत लेख हा डॉ. के. ना. वाटवे यांच्या 'संस्कृत गद्य-काव्याचे तीन शिल्पकार' या आगामी ग्रंथांतील एक भाग आहे. तो 'नवभारतां'त प्रसिद्धीस दिल्याबद्दल लेखकांचे आभारी आहोंत —का. सं.

१ 'प्रत्यक्षरश्लेषमयप्रपञ्चविन्यासवैदग्ध्यनिधिं प्रबन्धम्। सरस्वतीदत्तवरप्रसादाच्चक्रे सुबन्धुः सुजनैकबन्धुः।'. २ 'सरसीव कीर्तिशेषं गतवति विक्रमादित्ये'।—उपोद्घात, श्लोक १०.








आहीं ' या वृत्तीनें केला आहे. कारण सहाव्या शतकांत झालेल्या कांहीं ग्रंथांचा उल्लेख त्यानेंच 'वासवदत्तें'त केला आहे हें पुढें दाखविलेंच आहे.

आतां सुबन्धूबद्दल इतरांनीं केलेल्या उल्लेखांवरून त्याच्या कालावर कांहीं प्रकाश पडतो कीं काय तें पाहावयाचें. 'गउडवहो' नांवाच्या आपल्या प्राकृत महाकाव्यांत (सर्ग ५-८००) वाक्पतिराजानें म्हटलें आहे कीं 'भास, कालिदास, सुबन्धु व हरिचंद्र यांच्या काव्यांनीं मला आनंद होतो.' वाक्पतीनें आपलें काव्य इ. स. ७३३ ते ७५३ च्या दरम्यान लिहिलें असें संशोधकांचें मत आहे. वाक्पतीनें उल्लेखिलेला सुबन्धु हा 'वासवदत्ते'चा कर्ता असेल, तर सुबन्धूचा काळ इ. स. ७३३ च्या पूर्वीचा ठरतो. वामनानें आपल्या 'अलंकारसूत्र-वृत्ती'-मध्यें 'उत्कलिकाप्राय' नांवाच्या रचना-विशेषाचें उदाहरण म्हणून 'वासवदत्तें'तील कांहीं ओळी दिल्या आहेत. वामनाचा काल अजमासें इ. स. ७५० मानतात; यावरूनहि सुबन्धु हा तत्पूर्वी होता हें दिसतें. यानंतर सुबन्धूचा गौरवानें उल्लेख करणारे राजशेखर, कविराज, मङ्ख, वामन-बाण, शार्ङ्गधरपद्धतिकार किंवा सूक्तिमुक्तावली-कार हे तदुत्तरकालीन असल्यानें कालदृष्ट्या तरी त्यांच्या उल्लेखांना महत्त्व नाहीं. यानंतर राहिले बाण व भवभूति. या दोघांनींहि 'वासवदत्ते'चा उल्लेख केला आहे. पण या साऱ्या उल्लेखांची मौज ही आहे कीं, कोणी नुसता 'वासवदत्ते'चा तर कोणी नुसत्या सुबन्धूचा उल्लेख करतात. 'वासवदत्तेचा कर्ता सुबन्धु' असा एकत्र व निश्चित उल्लेख कोणीच करीत नाहीं! त्यामुळें कोणती 'वासवदत्ता' व कोणता सुबन्धु याचा निर्णय करतां येत नाहीं.

सुबन्धु नांवाचा सूक्तें रचणारा एक ऋषि होता. अभिनवगुप्त एका प्राचीन सुबन्धूचा उल्लेख 'महाकवि सुबन्धुनिबद्धो वासवदत्तानाट्यपाराख्यः समस्त एव प्रयोगः।' (ना. शा. १२-१८ टीका) असा करतो. नाटककार व नाट्यशास्त्रकार म्हणून शारदातनयानें त्याच सुबन्धूचा उल्लेख केला आहे.[३] 'वासवदत्ता-नाट्यपार' नांवाचें एक नाटक 'नाट्यपार' नांवाच्या एका नाट्यप्रकाराचें प्रत्यक्ष उदाहरण देण्यासाठीं याच सुबन्धूनें उदयन-वासवदत्ता-प्रसंगावर लिहिलें त्याचा उल्लेख दण्डी आपल्या 'अवन्तिसुन्दरीकथे'मध्यें करतो.[४] तीच स्थिति वासवदत्तेची. उदयनाची पत्नी व प्रद्योताची कन्या वासवदत्ताच होती. तिचा उल्लेख 'बृहत्कथें'त व 'मेघदूतां'त असून भासाचें 'स्वप्नवासवदत्त' व श्रीहर्षाची 'रत्नावली' यांची नायिका तीच आहे. इतकेंच नव्हे, तर 'वासवदत्ता' नांवाच्या एका आख्यायिकेचा स्पष्ट उल्लेख पतंजलीनें आपल्या महाभाष्यांत केला आहे. कात्यायनाच्या वार्तिकावर टीका लिहितांना त्यानें तीन आख्यायिकां-चीं नांवेंच दिलीं आहेत. तीं अशीं : वासव-दत्ता, सुमनोत्तरा व भैमिरथी (पाद. ४·२·६० वरील वार्तिक). या दृष्टीनें बाण-भवभूतींच्या उल्लेखांकडे पाहिलें पाहिजे.

बाण आपल्या 'हर्षचरिता'च्या उपोद्घातांत म्हणतो कीं 'इंद्रानें दिलेल्या (वासवेन दत्तया) शक्तीचा लाभ कर्णाला झाल्यामुळें (कर्णगोचरं गतया) पांडवांचा गर्व जसा गळाला तसा वास-वदत्ता कवींच्या कानांपर्यंत पोहोंचल्यानें कवींचा गर्व गळाला.'[५] यांत बाणानें वासवदत्ता-स्तुति मोठी मनापासून व सुंदरपणें केलेली आहे यांत शंकाच नाहीं. पण ही 'वासवदत्ता' सुबंधूचीच का दुसरी कोणाची हें स्पष्ट नाहीं. व बाणभट्टासारख्यानें इतकी स्तुति करावी अशी पात्रता या 'वासव-दत्ता' कथेची आहे कीं काय हाहि प्रश्न विचार-णीय आहे. पण अनेक पाश्चात्त्य व पौरस्त्य टीका-कारांनीं ही 'वासवदत्ता' सुबंधूचीच असें गृहीत धरून बाण हा सुबंधूनंतरचा व त्याच्याच वासव-दत्तेच्या प्रेरणेनें आपली काव्यसंपदा निर्माण करणारा आहे असें आपलें मत दिलें आहे. श्लेषाचा उपयोग, दैवी शक्तीचा वापर, शुकसारिकांची

---

३ 'सुबन्धुर्नाटकस्यापि लक्षणं प्राह पञ्चधा।' (भावप्रकाशन. २३८). ४. 'सुबन्धुः किल निष्क्रान्तो बिंदुसारस्य बन्धनात्। वत्सराजो...।' (अ. सुं. कथा). ५ 'कवीनामगलद्दर्पो नूनं वासवदत्तया। शक्त्येव पांडुपुत्राणां गतया कर्णगोचरम्॥' (हर्षचरित-१-श्लोक ११).








## 'वासवदत्ता'कार सुबन्धु

मानुषसदृश कृति व उक्ति इत्यादी नवलकथांचे विशेष 'वासवदत्ता' व 'कादम्बरी' यांत समान आहेत हेंहि खरें आहे. पण बाणानें उल्लेखिलेली 'वासवदत्ता' दुसरीच असण्याचा संभव जास्त दिसतो. कारण बाणाला 'हर्षचरित' ही 'आख्यायिका' लिहावयाची असल्यानें साहजिक तो आख्यायिका असलेल्या वासवदत्तेचाच उल्लेख करील हें अधिक संभवनीय दिसतें. कारण बाणच अगोदरच्या म्हणजे दहाव्या श्लोकांत आख्यायिका-कारांना वंदन करून मगच अकराव्या श्लोकांत वासवदत्तेची (सुबन्धूचें नांव न घेतां) वरील प्रमाणें स्तुति करतो. तसेंच सुबन्धूची 'वासवदत्ता' ही 'कथा' आहे, आख्यायिका नव्हे, हें लक्षांत घेतलें पाहिजे. तें लक्षांत यावें म्हणूनच कीं काय बाणानें, ज्यांच्या प्रकरणांना 'उच्छ्वास' असें म्हणतात त्या आख्यायिकांचाच, 'उच्छ्वास' शब्दांवर मुद्दाम श्लेष साधून, स्पष्ट नामनिर्देश केला आहे. [६]

दुसरें असें कीं बाणानें वरील श्लोकांत सुबन्धू-च्याच 'वासवदत्ते'चा निक्षून उल्लेख केला असता, तर त्यानें तिचें वैशिष्ट्यविरहित वर्णन केलें नसतें. त्यानें भास, गुणाढ्य, कालिदास यांच्या कृतींचीं वैशिष्ट्यें नेमकीं दिलीं आहेत. आणि सुबन्धूच्या 'वासवदत्ते'चें कोणाहि सामान्य वाचका-च्या डोळ्यांत सहज भरणारें व ज्याकडे सुबन्धूनें मुद्दाम अङ्गुलिनिर्देशहि केला आहे असें 'प्रत्यक्षर-श्लेषमयत्व' हें ठळक वैशिष्ट्य आहेहि. तें बाणा-सारख्या मार्मिक कवीच्या नजरेंतून मुळींच सुटलें नसतें. आणि ज्याअर्थी तें श्लेषवैशिष्ट्य त्यानें वर्णिलें नाहीं त्याअर्थी त्यानें उल्लेखिलेली 'वासवदत्ता' सुबन्धूची नव्हे. बाणानें आपल्या 'कादंबरी'च्या उपोद्घात-पद्यांत (श्लोक २०) आपल्या कृतीचें 'अतिद्वयी कथा' असें वर्णन केलें आहे. त्याचा खरा अर्थ अद्वितीय, अपूर्व असाच दिसतो. पण भानुचंद्रासारख्या कांहीं टीकाकारांनीं त्याचा अर्थ "गुणाढ्याची 'बृहत्कथा' व सुबन्धूची 'वासवदत्ता' या दोन कथांहून श्रेष्ठ" असा केला आहे. पण ही 'वासवदत्ता' सुबन्धूची नव्हे. व दुसरें असें कीं ज्या बृहत्कथेची व ज्या 'वासवदत्ते'ची त्यानें 'हर्षचरितां'त एवढी स्तुति केली त्यावरच कुरघोडी करणारी कथा आपण रचीत आहों असें विनयसंपन्न बाण आपण होऊन स्पष्टपणें म्हणेल हें संभवनीय दिसत नाहीं. म्हणून हा अर्थ ओढाताणीचा मानावा.

हा बाणकृत उल्लेख सुबन्धूच्या 'वासवदत्ते'चा नव्हे, हें दुसऱ्याहि एक-दोन प्रमाणांनीं सिद्ध होईल. पहिली गोष्ट ही कीं 'वासवदत्ते'त प्रत्येक अक्षरावर श्लेषरचना असलेल्या शैलीव्यतिरिक्त सुबंधूचें स्वतःचें फार थोडें आहे. त्याची नव-निर्माणक्षमता व औचित्यविवेकशक्ति अगदीं बेतावाताची आहे. पण 'वासवदत्ता' व 'कादंबरी' यांतील साम्य तर फार मोठें आहे, हें अगदीं उघड आहे. दोन्हीकडे शुकच कथा सांगतात. जसा मकरन्द कंदर्पकेतूची निर्भर्त्सना करतो तसाच कपिंजलहि पुंडरीकाची करतो; निसर्गवर्णनांत त्याच कल्पना व कांहीं ठिकाणीं तेच शब्द; 'इंद्रायुधा'चा अश्ववर्णनांत दोहींकडे उल्लेख; (कंदर्पकेतु व महाश्वेता यांना उद्देशून) प्राणपरित्यागा-पासून परावृत्त करणारी आकाशवाणी दोहींकडे सारखीच; पौराणिक उल्लेख तेच. अशा स्थितींत यांपैकीं कोणी तरी एक दुसऱ्याचें अनुकरण करतो हें सत्य अंगीकारल्यावाचून गत्यन्तर नाहीं. ज्याची नवनवोन्मेषशालिनी प्रज्ञा अत्यंत प्रखर, जो वाणीचा पति आणि ज्याचा वाङ्मयचौर्यावर कटाक्ष [७] तो बाण सुबंधूच्या वासवदत्तेचें अनुकरण करील, का बेताबाताच्या कवित्वशक्तीचा व श्लेष-

---

६ 'उच्छ्वासान्तेऽप्यखिन्नास्ते येषां वक्त्रे सरस्वती। कथमाख्यायिकाकारा न ते वन्द्याः कवीश्वराः।' (ह. च. १-१०). ७ 'सन्ति श्वान इवासंख्या जातिभाजो गृहे गृहे। उत्पादका न बहवः कवय शरभा इव ॥ अन्यवर्णपरावृत्त्या बन्धचिन्हनिगूहनैः। अनाख्यातः सतां मध्ये कविश्चोरो विभाव्यते ॥ (ह. च. १-५-६).












मातङ्गूर सुबंधु बाणाच्या ' कादंबरी 'चें व क्वचित् ' हर्षचरिता 'चेंहि अनुकरण करील हें अंदाजणें अवघड नाहीं. सुबंधूनेंच बाणाचें अनुकरण केलें व त्या वरवरच्या अनुकरणांत बाणाच्या अव्वल कलाविशेषांचें अनुकरण करणें मात्र त्याला शक्य झालें नाहीं, हेंच त्यांतलें खरें सत्य दिसतें.

भवभूतीनें केलेला ' वासवदत्ते 'चा उल्लेख काव्यग्रंथ म्हणून नाहीं. तो वासवदत्ता ही एक आख्यायिकेंतील नायिका आहे अशा अर्थाचा आहे. कामंदकी मालतीस सांगते कीं " वासवदत्ता च संजयाय राज्ञे पित्रा दत्तमात्मानमुदयनाय प्रायच्छत् " ( मा. मा. २.७ ). येथें ' संजयाला टाकून उदयनाला वरणारी वासवदत्ता ' निर्देशिली आहे. ती अर्थात् खिस्तपूर्वकालीं पतंजलीनें उल्लेखिलेल्या आख्यायिकेंतील दिसते. भवभूतीला जर सुबन्धूची 'वासवदत्ता' माहीत असती तर त्यानें तिचा उल्लेख येथें केला असता. कारण सुबन्धूची वासवदत्ता उदयनकथेंतील वासवदत्तेहून इतर तपशिलांत जरी भिन्न आहे तरी पित्यानें ठरविलेला पुष्पकेतु हा वर टाकून देऊन तिच्या मनांत भरलेल्या कंदर्पकेतूसच तिनें अखेर वरिलें. या साम्यासाठीं वरील प्रसंगीं सुबन्धूच्या वासवदत्तेचा उल्लेख भवभूतीस करावयास कांहींच हरकत नव्हती. पण सुबन्धूची इतकी प्रसिद्ध ' वासवदत्ता ' त्याच्या नजरेंतून सुटते याचा अर्थ, ती भवभूतीनंतर प्रकट झाली, असा होतो.

आतां ' मालतीमाधव ' व सुबंधूची ' वासवदत्ता ' यांत बाणाच्या ग्रंथाप्रमाणेंच कांहीं विलक्षण साम्यें आढळतात या गोष्टीचाहि अर्थ भवभूतीनंतर आलेल्या सुबन्धूनें त्या त्या स्थलांचा आपल्या ' वासवदत्ते 'त उपयोग केला असला पाहिजे असाच लावावा लागतो.

भवभूतीच्या ' मालतीमाधवां 'तील कांहीं ठळक साम्यस्थळें सुबंधूच्या ' वासवदत्ते 'त आढळतात. तीं अशीं : स्मशानवर्णन ( मा. मा. अं. ५ ) बीभत्सरसोत्पत्तीसाठीं दोन्हीहि ठिकाणीं आहे. वासवदत्तेला विरहावस्थेंत कंदर्पकेतूचा लागलेला ध्यास आणि माधवाला लागलेला मालतीचा ध्यास ( अंक ५–१० ) अगदीं त्याच शब्दांत दोन्हींकडे वर्णिला आहे. व ' सानन्दं नन्दिहस्ताहतमुरजरवाहूतकौमारबर्हित्रासात् ' ही 'मालतीमाधवां'तील नान्दीपद्यांतील कल्पना ( मा. मा. १-१ ) अगदीं त्याच शब्दांत ' वासवदत्ते 'त आली आहे (' क्वचित् अतिगंभीरमुरजरवाहूतसानन्दनर्तितनीलकंठम् '). वरीलसारखीं साम्यें केवळ योगायोगानें आलेलीं नव्हत. म्हणून बाणाच्या बाबतींतीलच न्याय भवभूतीसारख्या परिणतप्रज्ञ नाटककाराला लावला पाहिजे आणि सुबंधूच भवभूतीचेंहि अनुकरण करतो असें म्हटलें पाहिजे.

बाण व भवभूति यांचे काल निश्चित आहेत : बाण हा सातव्या शतकाच्या पूर्वार्धांतला ( इ. स. ६५० ) आणि भवभूति सातव्या शतकाचा शेवट व आठव्याचा प्रथमपाद यांच्या दरम्यानचा ( इ. स. ६८० ते ७२५). यावरून असें स्पष्ट दिसतें कीं वासवदत्तेचा रचनाकाल अजमासें इ. स. ७२५ ते ७३० हा असावा. म्हणजे बाण व वामन यांच्या दरम्यानच्या काळांत तो होऊन गेला असावा.

सुबंधूच्या ' वासवदत्ते 'मध्यें 'छंदोविचिति'[८], उद्योतकराची ' न्यायविद्या ',[९] ' बौद्धसंगति '[१०] इत्यादी ग्रंथांचे श्लेषयुक्त उल्लेख आलेले आहेत. हे सर्व ग्रंथ सहाव्या शतकांतलेच असल्यानें व सुबंधूच्या कालापर्यंत सुप्रतिष्ठित झाले असल्यानें सुबंधूनें त्यांचा उपमानस्थानीं उपयोग केला हें युक्तच होय. ' छंदोविचिति ' हा ग्रंथ दंडीच्या नांवावर मोडतो. त्याचा काल सामान्यतः इ. स. ६३५ ते ७०० असा मानतात. सहाव्या शतकांतहि तो होता असें कांहीं म्हणतात. दंडीच्या काळाचा संशय असला तरी त्याच्यापूर्वी ' छंदोविचिति ' नांवाचा दुसराहि ग्रंथ वराहमिहिराच्या ' बृहत्संहिते 'त उल्लेखिलेला आहे. तोहि सुबंधूनें उल्लेखिलेला असल्याचा संभव आहे. 'बौद्धसंगती'चा

८ ' छन्दोविचितिरिव कुसुमविचित्राभिः ।' ( पृ. १०८,१३५, ३०२. ). ९ ' न्यायविद्यामिव उद्योतकरस्वरूपाम् । ' ( पृ. ३०७. ). १० ' बौद्धसंगतिमिव अलंकारभूषिताम् ' ( पृ. ३०३. )







कर्ता भदन्त धर्मकीर्ति, व नैयायिक उद्योतकर हे सहाव्या शतकांतच होऊन गेले आहेत.

पूर्वकवींचा गौरवपूर्वक उल्लेख करणारीं जीं कांहीं पद्यें उपलब्ध आहेत त्यांपैकीं कांहींमध्यें सुबन्धूचा उल्लेख बाणाच्या पूर्वीं करण्यांत आलेला आहे, एवढयाच काडीच्या आधारावर कांहीं टीकाकारांनीं सुबन्धु बाणापूर्वीं होऊन गेला, असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. पण अशा पद्यांत कवींचा केवळ कालानुक्रमानेंच उल्लेख केलेला असतो असें जें गृहीत धरलेलें आहे तेंच मुळीं भ्रामक आहे. कविराजानें आपल्या ‘ राघवपाण्डवीयां ’त ‘ सुबन्धुर्बाणभट्टश्च कविराज इति त्रयः ’ असा उल्लेख केला आहे. पण वामनभट्टबाण आपल्या ‘ वीरनारायण चरितां ’त प्रथम बाणाचा, नंतर मयूराचा, नंतर सुबन्धूचा व शेवटीं आपला उल्लेख करतो[११] याचें काय करावयाचें ? शिवाय मङ्खाच्या[१२] ‘ श्रीकण्ठचरितां ’त सुबन्धूनंतर भारवीचा, ‘सूक्तिमुक्तावलीं’त[१३] सुबन्धूनंतर कालिदासाचा, ‘शार्ङ्गधरपद्धतीं’त[१४] माघानंतर भारवीचा व त्या दोघांनंतर कालिदासाचा असे जे उलटे उल्लेख आलेले आहेत ते सर्व कालक्रमदर्शकच मानले तर भारतीय कालक्रमशास्त्रावर मोठीच आपत्ति ओढवेल यांत शंका नाहीं ! अशा गौरवपर श्लोकांत श्लोककर्त्याची विशिष्टकविनिष्ठ गौरवबुद्धि, कांहीं कालक्रम व कांहीं तर केवळ श्लोकरचनेची सोय इत्यादि विचार कविनामक्रमांत असतात. निव्वळ कालानुक्रमविचार नसतो. तसेंच एका प्राचीन सुबन्धूच्या बाणपूर्वत्वाविषयींचा एक उल्लेख दण्डीच्या ‘ अवन्तिसुंदरीकथें ’त असल्याचें मागें सांगितलेंच आहे. पण दण्डीनें व इतरांनीं तेथें उल्लेखिलेला सुबन्धु हा ‘ वासवदत्ता ’ कार नव्हे हें लक्षांत ठेवावें.

‘ वासवदत्ता ’-कथाकार सुबन्धूच्या कालाचा एवढा विचार केल्यानंतर आतां त्याच्या इतर वैयक्तिक माहितीकडे वळूं.

### माळव्यांतील रहिवासी

खुद्द सुबन्धूबद्दल फारच थोडी माहिती उपलब्ध आहे. व जी थोडी माहिती उपलब्ध आहे, ती दन्तकथावजा व आनुमानिक आहे. तो वररुचीचा भाचा ( भागिनेय ) होता. तो वैष्णव असून मीमांसकमताचा अभिमानी होता, हें मात्र त्याच्या दोन मंगल पद्यांवरून ( २, ३ ) व मीमांसेच्या गौरवपर उल्लेखावरून दिसतें. कोणी त्याला काश्मीरी ब्राह्मण समजतात, तर मनमोहन घोषांसारखे त्याला बंगाली मानतात. पण तो मध्यभारताचा ( विशेषतः माळवा प्रान्ताचा ) रहिवासी असावा असें त्याच्या त्या प्रदेशांतील कांहीं विशिष्ट तपशिलाच्या वर्णनावरून वाटतें. व हेंच मत डॉ. रा. ग. हर्षे यांनीं कांहीं प्रमाणें देऊन मांडलें आहे (काणे-गौरवग्रंथ पृ. २१४–२०). श्वेतगोधूम[१५], मालवस्त्रियांचीं विशिष्ट तपशिलवार वर्णनें[१६], रेवेच्या काठीं कांहीं (खञ्जरीट किंवा काणाटीर ) पक्ष्यांचा मागोवा घेऊन सोनें शोधणारे किरात[१७] व विंध्य आणि सातपुडा या प्रदेशांत सर्वत्र खारें व मचूळ पाणी असल्यानें मुद्दाम गोडें पाणी शोधण्याचा यत्न[१८] या तपशिलावरून तो याच प्रदेशाचा चांगला माहितगार दिसतो. सुबन्धूनें प्रास्ताविक पद्य ( ३ ) मध्यें दामोदराचें म्हणजे कृष्णाचें जें वर्णन केलें आहे त्यांत त्याचा गुरु

---

११ ‘ प्रतिकविभेदनबाणः कवितातरुगहनविहरणमयूरः । सहृदयलोकसुबन्धुर्जयति श्रीबाणभट्टकविराजः ’। १२ ‘ वशं याते सुबन्धौ विधेः, शान्ते हन्त च भारवौ ’ । ( २–५३ ). १३ ‘ सुबन्धौ भक्तिर्नः क इह रघुकारे न रमते । ’. १४ ‘ माघो भारविकालिदासतरलाः स्कन्धः सुबन्धुश्च यः । ’

१५ ‘ तारकाः श्वेतगोधूमशालिनो नभःक्षेत्रस्य । ’ ( पृ. १९२ ). १६ ‘ चतुःषष्टिकलाकलापविदग्धमुखमालवनितम्बिनीनितम्बबिम्बसंवाहनकुशल : ।’ ( पृ. १४० ). १७ ‘ खञ्जरीट ( काणाटीर )–मिथुनमैथुनदर्शनोपजातनिधिग्रहणकौतुककिरातशतखन्यमानतीरया रेवया । ’–( पृ. ११३ ).

१८ ‘ अन्विष्यमाणस्वादुसलिलाशयम् । ’ ( पृ. २९१ )








भट्ट-दामोदर कवि याचें नांवहि त्यानें सूचित केलें आहे असें डॉ हर्षे यांचें अनुमान आहे ( डेक्कन कॉलेज् रिसर्च इन्स्टिट्यूट बुलेटिन्, व्हाल्युम् १, नं. २-४, पृष्ठें ४२१-२४, मार्च १९४० ). उदेपूर शिलालेखावरील काव्यपंक्ति लिहिणाऱ्या दामोदरकवीचा ( इ. स. ६७१ ) हा भट्ट दामोदर आजा असून तो श्लेषघन व वक्रोक्तिपूर्ण काव्य-रचनेबद्दल प्रसिद्ध आहे. याचे कांहीं श्लोक सुभाषितावलींत दिलेले आहेत.

### शब्दप्रभु, वक्रोक्तिनिपुण गद्यकवि

पण असल्या माहितीपेक्षां त्याच्या 'वासवदत्ता' या एकाच उपलब्ध ग्रंथावरून त्याच्याविषयीं जें अनुमान आपल्यास काढतां येईल तेंच अधिक विश्वसनीय होय. त्या दृष्टीनें पाहिली गोष्ट आपल्या नजरेस येते ती म्हणजे त्याचें असामान्य शब्द-प्रभुत्व. प्रत्येक शब्दागणिक ( –अक्षरागणिक ही अतिशयोक्ति म्हणून आपण सोडून देऊं– ) श्लेष साधावयाचा म्हणजे संस्कृत भाषेंतील अनेकार्थ-वाचक शब्दांचें केवढें सूक्ष्म व विस्तृत ज्ञान आवश्यक असतें याची कल्पनाच केलेली बरी. सुबन्धूनें केलेले श्लेष उकलून दाखवितांना त्याच्या टीकाकारांना अमराखेरीज पंधरा कोश तरी पालथे-उलथे करावे लागले आहेत ! हें त्याचें जसें शब्द-प्रभुत्व, तसाच त्याचा व्याकरण, अलंकार, न्याय, वेदान्त, मीमांसा, छंदस्, ज्योतिष इत्यादि शास्त्रांचा दाट परिचय होता असें दिसतें. जैनबौद्धमतांबद्दल त्याच्या मनांत आदर दिसून येत नाहीं. [१९]

रामायण, महाभारत व इतर पुराणें आणि आख्यायिका यांचाहि त्याचा व्यासंग फार दांडगा दिसतो. कारण योग्य प्रसंगीं वरील ग्रंथांतील उल्लेख त्यानें जागजागीं केलेले आढळतात. त्याची प्रतिभा बेताचीच दिसते. त्याच्यामध्यें भावनेपेक्षां बुद्धीचें, अनुभवजन्य ज्ञानापेक्षां ग्रांथिक विद्वत्तेचें आणि वास्तवापेक्षां काल्पिताचेंच प्राबल्य जास्त दिसतें. श्लेषरचनेच्या मार्गे लागल्यानें त्याला औचित्य व वस्तुसत्य यांवर पाणी सोडावें लागलें आहे. तथापि एकंदरीनें विचार केला असतां संस्कृत गद्याचें प्रचंड सामर्थ्य व्यक्त करणारा एक वक्रोक्ति-मार्गनिपुण विद्वान् गद्यकवि म्हणून त्याची जी ख्याति प्राचीनांमध्यें आहे तिला तो पूर्णपणें पात्र आहे, यांत संशय नाहीं.

---

१९ 'केचिज्जैमिनिमतानुसारिण इव तथागतमतध्वंसिनः।' (पृ. १७५).
'श्रुतिवचनमिव क्षपितदिगम्बरदर्शनम्' (पृ. २४१ व १०७).

---

## मध्यमवर्ग आणि लोकशाही

खरें स्वातंत्र्य म्हणजे स्वावलंबन होय. त्याकरितां मध्यमवर्गीयांनीं स्वतः काम, शारीरिक श्रम केले पाहिजेत. केवळ राजकीय स्वातंत्र्यानें किंवा राजकीय लोकशाहीनें खरें सुख मिळणार नाहीं. त्याकरितां सर्वच गोष्टींत समता प्रस्थापित झाली पाहिजे. मध्यमवर्गीयांनीं अगदीं अक्षरशः शारीरिक प्रत्यक्ष श्रम केल्याशिवाय आपली लोकशाही स्थिर होणार नाहीं. अमकें काम उच्च प्रकारचें, अमकें नीच प्रकारचें हा भेदभाव लोपला पाहिजे. असें झालें तरच हल्लींचा जन्माधिष्ठित पोषाखी मध्यमवर्ग जाऊन त्याऐवजीं परिश्रमी, गुणी, हस्तव्यवसायकुशल, बुद्धिमान्; दुसऱ्यांना मार्गदर्शक असा खरा गुणकर्माधिष्ठित 'मध्यमवर्ग' निर्माण होईल. हल्लींचा जन्माधिष्ठित 'मध्यमवर्ग' नामशेष झालाच पाहिजे आणि तो स्वेच्छेनें स्वखुषीनें झाला पाहिजे.

—श्री. चक्रवर्ती राजगोपालाचार्य, 'हिंदुस्थान टाइम्स' (२६–१–५२)








श्री. शंकरराव देव

# पंचवार्षिक योजनेचें स्वरूप

स्वतः नियोजनसमितीनेंच असें म्हटलें आहे कीं, नियोजनाचीं दोन घटक अंगें आहेत : (अ) ज्याच्या सिद्धीसाठीं सतत उद्योग करावयाचा अशीं निश्चित साध्यें ( ends ) व ( ब ) उपलब्ध साधन-संपत्तीचें ज्ञान व त्या साधन-संपत्तीची अधिकांत अधिक योग्य वांटणी ( optimum allocation). ज्या सरकारी ठरावान्वयें नियोजन-समितीची स्थापना झाली त्या ठरावांत पुढील-साध्यें घोषित केलीं आहेत :

"ज्या समाजव्यवस्थेंत सामाजिक, आर्थिक व राजकीय न्याय राष्ट्रीय जीवनांतील सर्व संस्थांमध्यें संचरून राहील, अशी समाजव्यवस्था संघटित करून व शक्य तितक्या परिणामकारक रीतीनें तिचें संरक्षण करून राज्य जनतेच्या सुखासाठीं प्रयत्न करील."..."विशेषतः पुढील गोष्टी साध्य करण्याच्या दृष्टीनें राज्य आपलें धोरण ठरवील : ( अ ) स्त्रीपुरुष या दोघांहि नागरिकांना उपजीविकेचीं पुरेशीं साधनें मिळविण्याच्या हक्क आहे; (आ) समाजांतील भौतिक साधनांची मालकी आणि नियंत्रण अशा तऱ्हेनें विभागलें जावें कीं, ज्यायोगें सर्वांचें जास्तींत जास्त कल्याण होईल; (इ) ज्या समाजव्यवस्थेंत संपत्तीचें व उत्पादनाच्या साधनांचें केंद्रीकरण होऊन समाजाचें अनहित होईल अशी अर्थव्यवस्था अमलांत नसावी."

## माणूस हेंच अन्तिम साध्य

हीं साध्यें कालान्तरानें सिद्ध होतील, अशा रीतीनें देशांतील साधनसंपत्तीचा कसा व कोणत्या क्रमानें उपयोग करावयाचा हें योजनापूर्वक ठरवून देणें हें नियोजनसमितीचें कार्य आहे. पण थोडा सूक्ष्म व सखोल विचार केल्यानंतर हें मान्य होईल कीं ज्याला साध्यें असें म्हटलें आहे तीं सत्यार्थानें साध्यें नसून तीं एक प्रकारें साधनेंच आहेत. 'लोकांचें कल्याण' करावें हें म्हणणें जितकें सोपें आहे तितकें 'कल्याण' म्हणजे काय हें ठरविणें कठिण आहे. माणसाला विवेकबुद्धि व दूरदृष्टि दिलेली आहे म्हणून त्याच्या कल्याणाचा विचार करूं लागलें कीं श्रेय व प्रेय यांच्यामधील भेद लक्षांत घ्यावा लागतो. 'यत्तदग्रे विषमिव'-चा स्वीकार करणें व 'परिणामे विषमिव'चा त्याग करणें ओघानेंच प्राप्त होतें. श्रेय व प्रेय यांच्यांतील समतोलपणा राखणें शक्य नसेल व प्रसंगच आला तर श्रेयाला श्रेष्ठ स्थान देण्याची व प्रेयाला गौण मानण्याची माणसाची तयारी नसेल तर अखेर त्यांचें अकल्याणच होईल.

ज्या आर्थिक व सामाजिक रचनेंत संधीची समता, सामाजिक न्याय, काम, पुरेशी मजुरी व कांहीं प्रमाणांत सुरक्षितता व स्वास्थ्य हीं मिळतील अशी आर्थिक व सामाजिक रचना निर्माण करण्याचा प्रयत्न शासनसंस्थेनें करावा, असा घटनेनें तिला आदेश दिला आहे. पण अशी समाज-रचना कशासाठीं करावयाची ? अर्थात् त्यांतून चांगला माणूस अथवा नागरिक निर्माण व्हावा म्हणून. तेव्हां अखेर साध्य माणूस आहे व बाकी सर्व साधनें आहेत. मानव हाच विश्वांतील सर्व वस्तूंचा मानदंड आहे. कारण माणसाला जाणीव अथवा ज्ञान असून उदात्त तत्त्वें व ध्येयें ओळखण्याची व त्यांच्याशीं समरूप होण्याची शक्ति त्याच्यांत आहे. ज्याच्या सर्वांगांचा समतोल विकास झालेला आहे,



अनुक्रमणिका





ज्याच्या बुद्धींत व भावनेंत सतत सुसंगति आहे, ज्याला सौंदर्यदृष्टि व नैतिक मूल्यें आहेत व ज्याचे सर्व व्यवहार सर्वात्मबुद्धीनें होतात, असा माणूस निर्माण करणें हा सर्व मानवी प्रयत्नांचा व योजनांचा हेतु असला पाहिजे. ही गोष्ट तत्त्वतः अत्यंत महत्त्वाची आणि सर्वसामान्य आहे खरी; परंतु बहुतेक वेळां धुरीणांना व संयोजकांना तिचा विसर पडतो. त्याचा परिणाम असा होतो कीं, साधनांनाच साध्य मानलें जातें व साध्यांना कमी महत्त्व देण्यांत येतें. किंबहुना पुष्कळ वेळां साध्यांचाच बळीहि देण्यांत येतो !

उदाहरणार्थ, याच सरकारी ठरावांत असें म्हटलें आहे कीं, नियोजनसमितीनें आपली योजना तयार करतांना भारताच्या घटनेंत घोषित केलेले मूलभूत हक्क व शासनसंस्थेला दिलेले आदेश लक्षांत घ्यावयाचे आहेत. त्याचप्रमाणें देशांतील नैसर्गिक संपत्तीचा कार्यक्षम उपयोग ( efficient exploitation ) करून उत्पादन वाढविणें व देशाच्या सेवेसाठीं सर्वांना कामाची संधि देऊन लोकांच्या राहणींत झपाट्यानें वाढ करणें हा जो सरकारचा हेतु तोहि लक्षांत घेतला पाहिजे. स्वतंत्र भारताच्या सरकारनें आपल्या डोळ्यांपुढें हा हेतु ठेवावा. सांप्रत ज्यांची राहणी अत्यंत खालावलेली आहे व जे कित्येक शतकें भुके व अर्धनग्न आहेत त्या भारतीयांना तो आकर्षक वाटावा यांत कांहींच आश्चर्य नाहीं. निसर्गाला जास्तींत जास्त राबवून माणसाच्या गरजा व राहणी सारख्या वाढवीत जाणें व त्यांतून त्याला रोजगार देणें हें सुधारणेचें व सभ्यतेचें मुख्य लक्षण आज बहुसंख्याक पाश्चिमात्य मानीत आहेत. यांत आम्हीं त्यांचेंच अंधानुकरण केलें आहे. जगण्यासाठीं व आपली जीवनयात्रा सुरळित रीतीनें चालविण्यासाठीं माणसाला निसर्गाची नाना प्रकारची मदत लागते. मानवी जीवन हा जसा त्याच्यांतील अंतःशक्तींशीं तसाच बाह्य शक्तींशींहि अखंड चाललेला संग्राम आहे. या संग्रामामुळें माणसाप्रमाणें निसर्गाचाहि विकास झाला आहे. तसेंच या संग्रामांत निसर्गावर विजय मिळवून त्याला आपल्या सेवेसाठीं व सुखासाठीं राबविण्याच्या कामीं माणसाला विज्ञान व तंत्रशास्त्र ( Science & Technology ) यांचें खूपच साहाय्य झालें आहे. शरीरश्रमाशिवाय शरीरसुखाचीं विपुल साधनें निर्माण करण्याची शक्यता यंत्रांमुळें निर्माण झाली आहे. माणसानें आपल्या गरजा कितीहि वाढविल्या तरी वाढत्या विज्ञानाच्या व यंत्राच्या मदतीनें निसर्गाची पिळवणूक करून त्या पुऱ्या करणें, पृथ्वीवर प्रत्यक्ष स्वर्ग निर्माण करणें अगदीं शक्य आहे, अशी माणसामध्यें श्रद्धा निर्माण झाली आहे. थोडक्यांत म्हणावयाचें तर अर्वाचीन संस्कृतीला यंत्रसंस्कृति हें नामाभिधान अगदीं सार्थ आहे.

### वैज्ञानिक प्रगति आणि माणसाचें कल्याण

पण निसर्गाचा नियमच असा दिसतो कीं, त्यांत कोणतीहि वस्तु कोणालाहि तिची किंमत दिल्याशिवाय प्राप्त होत नाहीं. यंत्राच्या बाबतींतहि हाच नियम लागू आहे. यंत्रामुळें मिळणारें स्वास्थ्य, सुख व ऐषआराम यांसाठीं माणसाला जबर किंमत द्यावी लागली आहे व लागत आहे. सांप्रत अशी परिस्थिति निर्माण झाली आहे कीं, माणसानें यंत्राला राबविण्याऐवजीं यंत्रच माणसाला राबवीत असून तें जणुं त्याच्यांतील माणुसकीचाच बळी घेत आहे ! विज्ञान निसर्गावर जसजसे विलक्षण विजय मिळवीत आहे व माणसाच्या संपत्तींत व स्वास्थ्यांत भर घालीत आहे, तसतशीं मानवी जीवनांतून नैतिक मूल्यें माघार घेत असून, माणसाच्या खऱ्या धार्मिक श्रद्धेचें पोषण करावयास बुद्धिवाद अपुरा पडत आहे. भौतिक शास्त्रें व त्यांतून जन्म पावलेला जड यंत्रवाद यांची पूजा करणारा मानव स्वतः हळू हळू जड बनत चालला तर त्यांत नवल कसलें ? ' तं तमेवैति कौंतेय सदा तद्भावभावितः । '. मनुष्य स्वतःचा धनी आहे व परिस्थितीवर मात करून स्वतःचें भाग्य निर्माण करण्याची शक्ति त्याच्यांत आहे हें खरें असलें, तरी भोंवतालच्या परिस्थितीचा त्याच्या स्वभावावर व शीलावर फार मोठा परिणाम होतो ही गोष्ट नाकारण्यांत हंशील नाहीं. अर्वाचीन संस्कृति व तिच्यामुळें श्रमाविना प्राप्त होणारें सर्व सुखासीन जीवन यांचें माणूस आनंदानें स्वागत करीत आहे हें अगदीं स्पष्ट आहे. शारीरिक व बौद्धिक श्रमांतून

व नैतिक बंधनांतून अखेर आपली मुक्ति झाली याबद्दल मानव उत्सव करीत आहे असें वरवर पाहणाऱ्याला वाटतें. तथापि आधुनिक मानवाचें मन थोडें अधिक तपासलें तर हें दिसून येतें कीं, तें भयग्रस्त व अशान्त आहे. अनिर्बंध विषय-सेवनानें आपल्या इंद्रियांचें तेज व शक्ति कमी होत आहेत याची त्याला अंधुक-अंधुक जाणीव झाली असून, कांहींना अर्वाचीन सुधारलेल्या जीवनांतील ग्राम्य सुखांचा वीट येत असावा असें दिसूं लागलें आहे. माणसाचें आरोग्य सुधारत असून आयुष्य वाढत आहे असें दिसतें, परंतु त्याच्या पूर्वजांशीं तुलना करतां तें खरोखर वाढत आहे किंवा कसें हें नक्की सांगतां येत नाहीं. आपल्या वाडवडिलांप्रमाणें माणूस श्रमाचें व दगदगीचें जीवन जगूं शकत नाहीं. कारण, त्याच्यांतील प्रतिकारशक्ति कमी झाली आहे. अर्वाचीन मनुष्याचे मज्जातंतु ( nervous system ) नाजुक व कमजोर झालेले आढळ-तात. आजच्या शहरी व यांत्रिक जीवनाचा ताण त्यांना सहन होत नाहीं व तें तुटून पडत आहे असें दिसतें. अनेक शारीरिक रोग नष्ट होत आहेत; पण त्यांची रिकामी पडलेली जागा नाना मानसिक रोग भरून काढीत आहेत. मानवाचें मानसिक दौर्बल्य हेंच संस्कृतीचें भयस्थान असतें. शिवाय आपल्या निर्वाहाचीं साधनें, आपली संपत्ति, आपला संग्रह आपण केव्हां गमावून बसूं याचा नियम नाहीं, या भयानें आजच्या माणसाचें मन सदा त्रस्त झालेलें आहे. सुरक्षिततेची भावना ही माणसाची एक नैसर्गिक गरज आहे. पण मौज अशी कीं, आज ज्या काळीं संपत्तीनें व शस्त्रसंभारानें पृथ्वी जणूं खचत आहे त्याच काळीं माणसाला आपल्या भविष्यकाळाची शाश्वती वाटे-नाशी झाली आहे ! या कालखंडांत शिक्षणाचा सार्वत्रिक प्रसार झालेला असला तरी त्या मानानें बुद्धिमान् लोकांची संख्या वाढलेली आढळून येत नाहीं. आजचा सुशिक्षित मनुष्य परिस्थिती-च्या पिंजऱ्यांत कोंडला गेला असून त्याची बुद्धि व क्रियाशक्ति जीवनाचे व्यावहारिक प्रश्न सोडवि-ण्यांतच बव्हंशीं खर्च होत आहे. शीलामागून सरस्वतीहि माणसाला सोडून जात असते. व्यापक दृष्टि व कार्याकार्यविवेचक बुद्धि असलेलीं धैर्यशील माणसें निर्माण करण्याला अर्वाचीन संस्कृति असमर्थ दिसते. अशा स्थितींत विज्ञानाच्या प्रगतीनें माणसाचें खरोखर कल्याण झालें आहे का, असा प्रश्न विश्वांतील विचारवन्त स्वतःला विचारूं लागले असले तर त्यांत आश्चर्य कसलें ?

### शास्त्रीय शोध आणि मानवी मूल्यांचें रक्षण

पण आमच्या योजनाकारांच्या मनांत ह्या प्रश्नांनीं फारशी चिंता उत्पन्न केली असावी असें दिसत नाहीं. कारण त्यांनीं पंचवार्षिक योजनेचा जो आराखडा तयार केला आहे त्यांत अर्वाचीन विज्ञान व यंत्रप्रधान संस्कृति सांप्रत ज्या भयानक रस्त्यावरून ठेंचा खात धडपडत जात आहेत, तो टाळण्याचा विशेष प्रयत्न केलेला दिसत नाहीं असें खेदानें म्हणावें लागतें. उदाहरणार्थ, भारतीयांची सध्यांची जीवनराहणी इतकी खालच्या प्रतीची आहे कीं, त्यांत पुष्कळच सुधारणा होणें आवश्यक आहे, याबद्दल दुमत होणेंच शक्य नाहीं. पण प्रश्न असा आहे कीं, ' पुढच्यास ठेंच, मागचा शहाणा ' या न्यायानें मानवी मूल्यें न गमावतां ती परि-स्थितिसापेक्ष सुधारावयाची तर तिची गति, स्वरूप व साधनें काय असावयाला पाहिजेत हा अत्यंत महत्त्वाचा व विचार करण्यासारखा प्रश्न आहे. जीवनराहणी सुधारावयाच्या प्रश्नाशीं, देशांतील जमीन, जंगलें, पाणी, खनिज संपत्ति वगैरे नैसर्गिक संपत्तीचा उपयोग व विकास कोणत्या दृष्टीनें व साधनांनीं करावयाचा व तो कोणीं करावयाचा, हा प्रश्न अत्यंत निगडित आहे. शीघ्र गतीनें राहणी सुधारावयाची हें ध्येय एकदां डोळ्यांपुढें ठेवलें कीं, जीवन सुधारण्याकडे थोडें दुर्लक्ष होणें अपरिहार्यच आहे. अशा योजनेंत निसर्गाला जास्तींत जास्त पिळून काढून त्याच्यांतील नानाविध संपत्तीचा विकास करून माणसाचे विलास वाढविणें यालाच प्राधान्य दिलेलें असतें. अर्वाचीन विज्ञानयुग व औद्योगिक सुधारणा यांची मुख्य प्रेरकशक्ति हीच आहे असें म्हटलें तर तें वस्तुस्थितीला सोडून होणार नाहीं. याचा परिणाम असा झाला आहे कीं, पदार्थ-विज्ञानशास्त्र, रसायनशास्त्र, खगोलशास्त्र यां-सारख्या जडसृष्टिविषयक शास्त्रांमध्यें कल्पनातीत







प्रगति झाली आहे. प्रचंड उद्योगधंदे व कारखाने उभारले गेले आहेत व अफाट शहरें अस्तित्वांत आलीं आहेत. मात्र या सर्वांना जन्म देणारा माणूस अंगुष्ठाएवढाच ठेंगू राहिला आहे! याचें मुख्य कारण असें कीं, ही भौतिक शास्त्रांची प्रगति जगांतील अत्यंत थोड्या अशा अद्वितीय बुद्धिमंतांच्या शोधक शक्तीमुळें घडून आली आहे. सामान्य मनुष्यानें तिला किंचितहि हातभार लावलेला नाहीं. या सर्व गोष्टी माणसाच्या खऱ्या हिताच्या दृष्टीनें केल्या गेलेल्याहि नाहींत. त्याचप्रमाणें विज्ञानाची वाढ योजनापूर्वक झालेली नाही. माणसाची स्थिति सुधारावी या खास हेतूनें शास्त्रज्ञांनीं क्वचितच आपलें संशोधनकार्य केलेलें आहे. शिवाय आपल्या समाजाची व सुधारणेची वाढ व विकास करण्यासाठीं जेव्हां जेव्हां आपण कांहीं शास्त्रीय शोधांचा उपयोग केला, तेव्हां तेव्हां आपल्या डोळ्यांपुढें मानवाच्या श्रेष्ठ मूल्यांचें व हितांचें रक्षण करणें हाच केवळ हेतु होता असेंहि नाहीं. स्वतःच्या फायद्यासाठीं कमींत कमी खर्चांत जास्तींत जास्त उत्पादन करणें हा अर्वाचीन औद्योगिक सुधारणेचा आत्मा आहे. माणसें जीं यंत्रें चालवितात व ज्या अफाट व बकाल शहरांतून तीं राहतात त्याचा त्यांच्या व त्यांच्या संततीच्या शरीरावर, स्वभावावर व मनावर काय अनिष्ट परिणाम घडून येत आहे याकडे कोणीहि विशेष लक्ष देत नाहीं. सर्वसाधारण माणसाची सध्यां सर्व बाजूंनीं नागवणूक होत असून त्याची श्रेष्ठ मानवी मूल्यांच्या बाबतींत अवनतीच होत आहे, असें म्हणणें भाग आहे. थोडक्यांत म्हणजे विज्ञान व सुधारणा त्याला वराच्या ऐवजीं शाप ठरूं पाहत आहेत!

यावर कोणी असें म्हणेल कीं, पांच वर्षांपुरती उत्पादनाची योजना तयार करणें हें ज्यांचें कार्य त्यांनीं इतका खोल व दूरपर्यंत जर विचार केला नाहीं तर त्यांना दोष देण्यांत त्यांच्यावर अन्याय करण्यासारखें होईल. या आक्षेपाला योजना तयार करणाऱ्यांच्याच शब्दांत पुढीलप्रमाणें उत्तर देतां येईल: "सुव्यवस्थित सर्वांगीण सुधारणा घडवून आणावयाची असेल, तर नियोजनाकडे ती एक अखंड प्रक्रिया म्हणूनच पाहिलें पाहिजे. एखादी योजना विशिष्ट मुदतीची असली तरी तिचे सर्व परिणाम त्या मुदतींत दृग्गोचर होतील असें नाहीं. म्हणून कोणत्याहि योजनेचें महत्त्व विशिष्ट मुदतींत दिसून येणाऱ्या तिच्या परिणामावरून न ठरवतां तिच्यामुळें समाजजीवनांत जे नवीन प्रवाह सुरू होतात त्यांच्यावरून ठरवावयाचें असतें."

या दृष्टीनें पंचवार्षिक योजनेचें मूल्यमापन केलें तर, असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं कीं, ही योजना पूर्णपणें अमलांत आणली तर भारतीय जीवनाचें जें स्वरूप बनेल तें सर्वोदयाच्या दृष्टीनें अगदीं भिन्न असेल.

### संपत्तीचा ओघ गरीबांकडे वळला पाहिजे

लोकांच्या राहणींत शीघ्र सुधारणा घडवून आणणें हा जो सरकारचा घोषित हेतु, तो डोळ्यांपुढें ठेवून ही योजना तयार करण्यांत आली आहे असें जें योजनाकारांचें म्हणणें आहे, त्याचाहि आणखी थोडा विचार करूं. लोक (people) ही एक एकजिनसी वस्तु (homogeneous entity) आहे असें साधारणपणें मानलें जातें. पण वस्तुस्थिति याच्याहून अगदीं भिन्न आहे. एकाच देशाचे व एकाच राज्यांतील लोक असले तरी त्यांत घडी केलेल्या सणंगाप्रमाणें एकाखालीं एक असे अनेक पदर असतात. शैक्षणिक, सांस्कृतिक, सामाजिक, आर्थिक वगैरे दृष्टींनीं त्यांच्यांत महदंतर असतें. आजच्या तथाकथित स्वतंत्र देशांतहि आज ही स्थिति आहे तर जो देश अनेक शतकें पारतंत्र्यांत होता, तेथील वर्गा-वर्गांतील विषमता काय वर्णावी! अशा स्थितींत स्वराज्य-सरकार आपणांला सर्व लोक सारखे असें म्हणून जर निरनिराळ्या वर्गांच्या लोकांची स्थिति सुधारण्याची गति सारखीच ठेवील तर अस्तित्वांत असलेली विषमता कमी कशी होणार? मग ती सर्वस्वीं नष्ट होण्याची गोष्ट तर दूरच राहिली! खरें म्हटलें तर अगदीं वरच्या व अगदीं खालच्या वर्गांच्या बाबतींत ही गति व्यस्त प्रमाणांत असली पाहिजे. स्वराज्य-सरकारची या बाबतींतील नीति सर्वोदयी म्हणजे (Unto This Last) पाहिजे. पाणी ज्याप्रमाणें सखोल भागाकडे आधीं जातें, वाटेंतील खांचखळगे भरून काढतें व मग प्रवाहाच्या पृष्ठ-








भागाची आपली पातळी समान ठेवतें त्याप्रमाणें सरकारच्या संपत्तीचा ओघहि प्रथम समाजांतील जो अगदीं मागसलेला व गरीब वर्ग त्याकडे वळला पाहिजे. पंचवार्षिक योजना या कसोटीला उतरत नाहीं असें दुःखानें म्हणावें लागतें. कारण या तत्त्वाला धरून योजना आंखावयाची तर निरनिराळ्या प्रदेशांमध्यें किंवा राज्यांमध्यें आज आर्थिक विकासाच्या दृष्टीनें जें अंतर आहे तें कमी करणें व भरून काढणें व शक्य तों त्यांना स्वावलंबी बनविणें यांसाठीं भांडवली खर्चाच्या योजनेची खास आंखणी केली पाहिजे. म्हणजेच राष्ट्रीय नियोजन हें भारतीय त्याचप्रमाणें प्रादेशिक अशा दोन्हीहि भूमिकांवरून झालें पाहिजे.

तसेंच, देशांतील बहुसंख्यांक गरीब लोकांच्या राहणींत सुधारणा करण्यासाठीं जी योजना व जो भांडवली खर्च करावयाचा तो अशा रीतीनें झाला पाहिजे कीं, त्यामुळें ते स्वतः स्वावलंबनानें व स्वाभिमानानें राहूं शकतील. हें धोरण मान्य करून जर योजना आंखावयाची तर मग देशांतील काम करूं शकणाऱ्या प्रत्येक मनुष्याला त्याच्या शक्तिबुद्धी-प्रमाणें काम देणें व ज्यांचा तो सहज उपयोग करील व जीं त्याला तत्काळ उपलब्ध होतील अशीं अवजारें देणें हेंच तिचें मुख्य लक्ष्य असलें पाहिजे, हें ओघानेंच प्राप्त होतें. त्याचप्रमाणें प्रत्येकाच्या कल्याणासाठीं त्याच्या कामांत व साधनांत जी सुधारणा करणें आवश्यक असेल तेवढीच सुधारणा त्याला झेपेल अशा रीतीनें त्याच्याकडूनच क्रमाक्रमानेंच केली, तरच त्याच्या व्यक्तित्वाचा खरा विकास होऊं शकेल. आणि कोणत्याहि योजनेचें अंतिम व एकमेव ध्येय हेंच व एवढेंच असलें पाहिजे. यामुळें कांहीं लोकांच्या राहणींत झपाट्यानें वाढ होणार नाहीं असा संभव आहे. परंतु खात्री आहे कीं, त्यामुळें हळू हळू पण सर्वांच्याच राहणींत समप्रमाणांत सुधारणा (uniform improvement) होईल. असें होईल तरच निसर्गतः जितकी शक्य आहे, तितकी समता समाजांत स्थापित होऊन देशांत शान्ति नांदेल व लोकांना सुख लाभेल.

**योजनेमागें खास जीवनदृष्टीचा अभाव**

या धोरणाप्रमाणें योजना आंखून ती अंमलांत आणावयाची तर देशाची प्रथम विस्तृत पाहणी करून त्याच्याजवळ सामान, संपत्ति व मनुष्यबळ किती आहे याची शक्य तितकी बरोबर माहिती मिळविली पाहिजे. नियोजन म्हणजे निश्चित सामाजिक साध्यें सिद्ध करण्यासाठीं जास्तींत जास्त फायदेशीर रीतीनें साधन-संपत्ति संघटित करून तिचा उपयोग करण्याची रीति—अशी स्वतः नियोजनकारांनींच नियोजनाची व्याख्या केली आहे. आणि म्हणून सरकारी ठरावानें नियोजनसमितीवर जी कामगिरी सोंपविली आहे तींत देशांत साधनें, संपत्ति, (भांडवल) व मनुष्यबळ किती आहे याचा अंदाज काढणें याला पहिलें स्थान दिलें आहे तें अगदीं योग्य आहे. परंतु ज्यांच्यावर ही कामगिरी सोंपविण्यांत आली होती, त्यांनींच अशी कबुली दिली आहे कीं, 'आमच्याजवळ ही माहिती नसल्यामुळें आमची योजना शास्त्रीय आहे असें आम्ही म्हणूं शकत नाहीं.' म्हणून पंचवार्षिक योजना म्हणजे निरनिराळ्या दृष्टींनीं तयार केलेल्या योजनांची एकत्रित केलेली यादी अशी जर कोणीं टीका केली तर ती अयथार्थ आहे असाहि ते प्रतिवाद करीत नाहींत.

ज्यांना या नियोजनमंडळाच्या कामाची थोडी आंतली माहिती आहे त्यांना हें माहीत आहे कीं, निरनिराळ्या राज्यसरकारांनीं स्वतःच्या दृष्टीनें ज्या योजना बनविल्या, त्यांची छाननी करून त्यांचा पंचवार्षिक योजनेंत समावेश करण्यांत आला आहे. या सर्वांचा परिणाम असा झाला आहे कीं, पंच-वार्षिक योजनेच्या मागें कांहीं खास जीवनदृष्टि वा समाजचित्र नाहीं.

वर म्हटल्याप्रमाणें समाजांतील निरनिराळ्या थरांच्या लोकांच्या राहणींत जें अंतर आहे तें नाहींसें करून त्यांत समप्रमाणांत वाढ करावयाची व सर्वांना स्वतःच्या व्यक्तित्वाचा विकास करण्याची समान संधि द्यावयाची, तर सरकारी संपत्तीचा ओघ प्रथम खालच्या थरांतील लोकांकडे जोरानें वळला पाहिजे हें जितकें खरें आहे, तितकेंच यापुढें धनोत्पादनाचें काम अशा पद्धतीनें झालें पाहिजे कीं, त्यांत जास्तींत जास्त लोकांना भाग घेण्याची संधि मिळून संपत्तीचा अधिकांश

त्यांच्या वांट्याला येईल. प्रत्यक्ष धनोत्पादनाच्या दृष्टीनें शेती व उद्योगधंदे याच दोन मुख्य बाबी असून त्यांतच देशांतील बहुसंख्याक लोकांना काम वा रोजगार देण्याची क्षमता असते. भारताची लोकसंख्या आज ३५ कोटींच्या वर आहे. म्हणजे भारताजवळ प्रचंड मनुष्यबळ असून या बळाचा ज्या-योगें धनोत्पादनाच्या कामांत स्वाभिमानानें व समतेनें उपयोग होईल अशा सामाजिक व आर्थिक रचनेचा पाया घातला जाणें हेंच पंचवार्षिक योजनेचें मुख्य लक्ष्य असावयास पाहिजे. या अफाट लोकसंख्येपैकीं शेंकडा ७० ते ७५ टक्के खेड्यांत राहतात व काम करणाऱ्या लोकां-( working population ) पैकीं जवळजवळ शेंकडा ७० टक्के शेतीचा उद्योग करतात. या आंकड्यांवरून या देशांत शेतीचें महत्त्व फार मोठें आहे हें चटकन् मनांत भरतें. पण आज आमच्या शेतीची स्थिति अशी आहे कीं, त्यांत काम करणाऱ्या लोकांना नेहमीं पूर्ण काम मिळूं शकत नाहीं. वर्षांतून कित्येक महिने हे लोक बे-रोजगार असतात. त्याचप्रमाणें शहरी उद्योगांनीं ग्रामोद्योगाला ठार मारलें असल्यामुळें खेड्यांतील कारागिरालाहि पुरा उद्योग राहिला नाहीं. त्यांतील कांहीं शहरांतील कारखान्यांतून व उद्योगांतून रिचवले गेले असले तरी, त्यांच्यापैकीं फार मोठी संख्या पुन्हा शेतीच्या कामांत सामील झाल्यामुळें शेतीवरचा ( काम करणारांचा व खाणारांचा ) बोजा भरमसाट वाढला आहे. खेड्यांतील कोट्यवधि पूर्ण बेकारांना किंवा अपुरी रोजगारी असलेल्या लोकांना पूर्ण रोज-गार देऊन त्यांच्या राहणींत सुधारणा करावयाची म्हटली म्हणजे शेती-व-ग्रामोद्योगांची शुद्ध शास्त्रीय पायावर प्रचंड प्रमाणांत पुनर्घटना करणें हें स्वराज्य-सरकारपुढील पहिलें महत्त्वाचें कर्तव्य ठरतें.

## ग्रामोद्योगांचें भारतीय जीवनांत स्थान

या दृष्टीनें विचार केला तर पंचवार्षिक योजनेंत शेतीसुधारणेला पहिलें स्थान देण्यांत आलें आहे व ग्रामसुधारणेच्या कार्यक्रमांत घरगुती उद्योगांना ( —येथें ग्रामोद्योग हा शब्दप्रयोग अधिक सार्थ झाला असता, कारण घरगुती उद्योग व ग्रामोद्योग यांत मोठा फरक आहे — ) केंद्रीय स्थान आहे असें जें म्हटलें आहे तें अगदीं योग्यच आहे. शास्त्रीय पद्धती-( Rationalization ) नें म्हणजे दुसऱ्या शब्दांत बोलावयाचें तर अवजारांत जरूर ती सुधारणा करून काटकसरीनें शेती केली तर आज शेतीवर काम करणारांपैकीं पुष्कळच लोक बेकार होतील व त्यांना नवीन काम द्यावें लागेल. ज्यांना ज्यांना काम द्यावें लागेल अशा या लोकांची संख्या सर्व देशांत लोकसंख्येच्या एकतृतीयांशाइतकी प्रचंड असेल असें पंचवार्षिक योजनेंतच मान्य करण्यांत आलें आहे. खेड्यांतील या अफाट लोक-वस्तीला उद्योग द्यावयाचा म्हटलें तर, निदान नजीकच्या भविष्यकाळांत ग्रामोद्योगाशिवाय दुसरें साधन देशाला उपलब्ध नाहीं, ही गोष्ट योजना-कारांना कबूल आहे. पण हें सर्व मान्य करूनहि या प्रश्नाचें गांभीर्य योजनाकारांच्या लक्षांत जितकें यावयास पाहिजे तितकें आलेलें नाहीं असें खेदानें म्हणावें लागतें. कारण त्यांनीं आपल्या योजनेंत ग्रामोद्योगावर फक्त १६ कोटींची क्षुद्र रक्कम खर्च करण्याचें ठरविलें आहे.

खरें पाहिलें तर शेती व तिला संलग्न असे उद्योगधंदे अशी संमिश्र आर्थिक रचना ही भारताची इंग्रजांचा येथें प्रवेश होईपर्यंतची प्राचीन परंपराच आहे. भारत शेतीप्रधान देश आहे हें जितकें खरें, तितकेंच दोन शतकांपूर्वीपर्यंत तो उद्योगप्रधान देश होता हेंहि खरें आहे. हिंदुस्थानांत मोठमोठीं औद्योगिक शहरें होतीं, पण खेडयांतील फार मोठी जनता शेती व ग्रामोद्योग अशा दोन्हीहि क्षेत्रांत काम करीत असे. कापड तयार करण्याचा उद्योग तर देशभर पसरलेला असून शें. ५० टक्के लोक त्यांत गुंतलेले असत. या देशांत शंभर वर्षांपूर्वीं शेतावर काम करणाऱ्या लोकांचें शेंकडा प्रमाण आजच्यापेक्षां २५-३० टक्क्यांनीं कमी होतें हें वाचून पुष्कळांना आश्चर्य वाटेल. या प्राचीन परंपरेचें पुनरुज्जीवन करून तिला विवेक—दृष्टीनें जरूर ती विज्ञानाची व तंत्रशास्त्राची आम्हीं जोड दिली तर संभव आहे कीं, आम्ही एका सामा-जिक, आर्थिक संस्कृतीला जन्म देऊं व आजच्या मोठमोठ्या यंत्रांवर आधारलेल्या शहरी औद्योगिक सुधारणेनें जगापुढें ज्या मानवसंहारी बिकट समस्या







उभ्या केल्या आहेत त्या सोडविण्याचा मार्ग जगाला दाखवूं शकूं ! या नवीन रस्त्याची दिशा गांधीजींनीं आम्हांला दाखविली आहे, इतकेंच नव्हे तर, त्यांच्या कांहीं पहिल्या कुदळीहि त्यांनीं मारून ठेवल्या आहेत. पण तो रस्ता पुढें तयार करण्याची व त्यावर चालून जाण्याची श्रद्धा व शक्ति आज आमच्यांत उरलेली दिसत नाहीं. लोकांना रोजगार देण्याचें केवळ एक साधन म्हणून आम्ही ग्रामोद्योगांकडे पाहतों. एक नवीन सभ्यतेची वा संस्कृतीची पायाभूत वस्तु म्हणून आम्ही त्याचा स्वीकार करण्यास तयार नाहीं.

शिवाय ग्रामोद्योगांची विद्यमान स्थिति काय आहे याची समग्र व अचूक माहिती आमच्याजवळ नसून त्यांची वाढ कशी करावयाची यांचाहि खोल विचार आम्हीं केलेला नाहीं. तसेंच या धंद्यांमध्यें शास्त्रीय व तंत्रविषयक सुधारणा करून त्यांची उत्पादनशक्ति वाढविणें, त्यासाठीं जरूर त्या पद्धतीचें शिक्षण देण्याची व्यवस्था करणें, त्यासाठीं लागणाऱ्या भांडवलाची तरतूद करणें व मोठमोठ्या कारखान्यांतून उत्पन्न होणाऱ्या तत्सम मालाच्या चढाओढीपासून त्यांना कायद्याचें संरक्षण देणें या गोष्टी केल्या पाहिजेत हा मंत्र आपण नेहमीं जपतों. पण मनापासून व निश्चयानें त्या दिशेनें पाऊल मात्र क्वचितच टाकतों. याच गोष्टी मोठमोठ्या कारखान्यांसाठीं व उद्योगधंद्यांसाठीं करण्याकडे सरकारची व खाजगी धनपतींची जेवढी शक्ति व संपत्ति खर्च होते त्याच्या एकसहस्रांश जरी ग्रामोद्योगांकडे झाली तरी त्यांत क्रांतिकारक बदल होईल. पण खरी गोष्ट अशी कीं, सतत चढती राहणी हेंच सभ्यतेचें, संस्कृतीचें मुख्य लक्षण आहे या उसनवार घेतलेल्या भोळ्या कल्पनेनें आपण अगदीं भारले गेलों आहों. ही गरज भागविण्याचें सामर्थ्य आज ग्रामोद्योगांत आहे किंवा पुढें कधीं काळीं येईल असा विश्वास आपल्याला वाटत नाहीं.

शेतीची शीघ्र सुधारणा करून तिची उपज वाढविण्याच्या दृष्टीनें नियोजन-मंडळाचें धोरणहि फारसें उत्साह उत्पन्न करणारें नाहीं. देशांत गेल्या कित्येक वर्षांपासून अन्नाचा प्रश्न अतिबिकट झाला असून तो संतोषजनक रीतीनें सुटला नाहीं, तर देशांत कोणती परिस्थिति निर्माण होईल हें सांगणें कठिण आहे. इतकेंच नव्हे तर अशा परिस्थितींत पंचवार्षिक योजनाच मुळीं अंमलांत आणणें अशक्य होईल ही गोष्ट स्वतः योजनाकारच कबूल करतात. 'अन्नम् बहु कुर्वीत तद् व्रतम् ।' असा मंत्रघोष परकीय व स्वकीय सरकारांनीं पुष्कळ वर्षें चालविला असला तरी त्याचा फारसा उपयोग झालेला नाहीं, हेंहि तितकेंच खरें आहे. १९५१ अखेर देश अन्नाच्या बाबतींत स्वावलंबी झाला पाहिजे, हा १९४९ सालीं प्रधानमंत्र्यांनीं केलेला संकल्प विफल झाला आहे हें शरमेनें पण कबूल केलें पाहिजे. या विफलतेचीं सर्व कारणें केवळ अतिमानवी आहेत असेंहि म्हणतां येणार नाहीं. अन्नाच्या व इतर मुख्य गरजांच्या बाबतींत राष्ट्राला स्वावलंबी करणें हाच अखेरचा एकमेव उपाय आहे. त्यासाठीं शेतीचें उत्पादन वाढविणें हाच एकमेव प्रभावी मार्ग आहे. यासाठीं शेतीची सुधारणा करून तिची आर्थिक घडी पुन्हां नीट बसविणें अत्यंत जरूर आहे; एवढेंच नव्हे तर, या गोष्टींवर देशाची सर्व आर्थिक रचना सुव्यवस्थित व सुडौल तयार होऊन देशाचें पाऊल प्रगतीच्या मार्गावर पुढें पडणें अवलंबून आहे. म्हणून या पंचवार्षिक योजनेंत शेती व ग्रामसुधारणा यांच्यावर १९२ कोटी रुपये खर्च होणार आहेत हें योग्यच आहे. शेतीचें सांप्रतचें महत्त्व लक्षांत घेतां एका दृष्टीनें ही रक्कम कमीच आहे असेंहि कोणी म्हणेल. शेतीच्या उत्पादनांत फार मोठी वाढ होईल या आशेनेंच आम्ही एवढी मोठी रक्कम शेतीवर खर्च करीत आहोंत असें योजनाकारांनीं स्वतःच म्हटलें आहे. मात्र 'अधिक धान्य पिकवा' या मोहिमेचा कटु अनुभव लक्षांत घेतां केवळ जमिनींत रुपये ओतले म्हणजे अधिक धान्य आपोआप उगवतेंच असें नाहीं, याची जाणीव योजनाकारांना आहे, ही गोष्ट समाधानाची आहे.

### आर्थिक दृष्ट्या न परवडणारे शेतीचे तुकडे

या देशांतील शेतीचें उत्पन्न वाढवावयाचें असेल तर त्यासाठीं अनेक गोष्टी एकसमयावच्छेदें-करून होणें अवश्य आहे. त्या सर्व गोष्टींचा विचार स्थलाभावीं सध्यां करणें शक्य नाहीं. आजकाल धान्याच्या किंमती सपाटून वाढल्या आहेत, पूर्वीं-

पेक्षां किती तरी अधिक सार्वजनिक पैसा शेतींत गुंतवला गेला आहे व शेतीवर राबणाऱ्याला अधिक शाश्वती वाटावी म्हणून अनेक कायदेहि करण्यांत आले आहेत. असें असूनहि शेतीच्या उत्पादनांत म्हणावी तशी वाढ झालेली नाहीं, ही गोष्ट सर्वमान्य आहे. याचें कारण भारतीय शेतीचे प्रश्न सामान्यपणें मानलें जातें त्यापेक्षां अधिक मूलभूत ( fundamental ) आहेत. योजनाकारांच्या शब्दांतच बोलवावयाचें तर 'कशी तरी हातातोंडाची गांठ पडेल अशी जी आज भारतीय शेतीची स्थिति आहे तिच्याऐवजीं ती आर्थिक दृष्ट्या परवडेल अशी करणें, म्हणजेच आज शेतीचे जे लहान लहान तुकडे झाले आहेत त्यांच्याऐवजीं शेतीचें क्षेत्र मोठें करणें हा सर्वांत मुख्य व महत्त्वाचा प्रश्न ' आहे. आर्थिक दृष्ट्या न परवडणारे शेतीचे लहान लहान तुकडे हा भारतीय शेतीला जडलेला सर्वांत मोठा रोग आहे. सरासरी घेतली तर सर्वत्र शेंकडा साठ ते सत्तर टक्के जमिनीचे तुकडे ( holdings ) पांच एकरांच्या खालचे आहेत. म्हणून हीं शेतीचीं अगदीं लहान क्षेत्रें आर्थिक दृष्ट्या परवडतील इतकीं मोठीं करण्याचा मार्ग शोधून काढणें हें सर्वांत महत्त्वाचें काम ठरतें. नियोजनसमितीनें स्वतः सुचविल्याप्रमाणें ही गोष्ट चार प्रकारांनीं घडवून आणतां येईल : ( १ ) सर्व शेती राष्ट्राच्या मालकीची करून सामुदायिक शेती सुरू करणें; ( २ ) शेतीचें एक क्षेत्र केवढें असावें याची कमाल मर्यादा ठरविणें व अधिक जमीन काढून घेऊन तिचा लहान क्षेत्रें मोठीं करण्याकडे उपयोग करणें; ( ३ ) छोट्या छोट्या शेतकऱ्यांनीं सहकारी शेती करावी म्हणून त्यांना प्रलोभनें देणें; व ( ४ ) समग्र गांवची जमीन एक क्षेत्र समजून त्यावर सहकारी पद्धतीनें शेती करणें.

पण बारीकसारीक तुकड्यांत विभागणी या जडलेल्या महान् रोगापासून भारतीय शेतीची जोंपर्यंत सुटका होत नाहीं, तोंपर्यंत तिचा उत्कर्ष होऊन तिच्या उत्पादनांत समाधानकारक वाढ होणें शक्य नाहीं हें मान्य असूनहि त्यावर यांपैकीं खरा जालीम उपाय योजण्याचें धाडस योजनाकारांनीं दाखवूं नये हें आश्चर्य होय. पहिला मार्ग, शेतकरी हा स्वतंत्र व जमिनीवर मालकी हक्क असला पाहिजे या परंपरेच्या विरोधी आहे म्हणून, योजनाकारांनीं त्याज्य मानला आहे. दुसऱ्या मार्गाचा अवलंब करून जर जमिनीची वांटणी करावयाची तर ज्यामुळें सर्व समाज खालपासून ढवळून व खवळून निघेल अशा मूलभूत सामाजिक संघर्षांना जन्म देणाऱ्या अनेक व्यावहारिक अडचणी त्यांत आहेत म्हणून त्यांचा स्वीकार करणें इष्ट नाहीं असें योजनाकारांनीं ठरविलें आहे. येथें हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, आपल्या येथें जमिनीचे अगदीं लहानलहान तुकडे खूप झाले असले तरी त्याचा अर्थ मात्र असा नाहीं कीं, त्यामुळें जमिनीची विभागणी समप्रमाणांत झाली आहे. वस्तुस्थिति याच्या अगदीं उलट आहे. उदाहरणार्थ, मुंबई प्रांत रयतवारी प्रांत असूनहि त्यांत पांच एकरांपर्यंत ज्यांची जमीन आहे असे दहा लाख खातेदार आहेत, तर ९१८ खातेदार असे आहेत कीं ज्यांची जमीन वरीलपैकीं पांच लाख खातेदारांच्या जमिनीपेक्षां थोडी अधिक आहे. लहान खातेदारांपैकीं ५० टक्के खातेदारांच्याजवळ एकूण जमिनीच्या एकदशांशापेक्षां कमी जमीन आहे. तर ज्यांच्याजवळ २५ एकरांपेक्षां अधिक जमीन आहे अशा अकरा टक्के खातेदारांपाशीं एकूण जमिनीच्या निम्मी जमीन आहे. त्याचप्रमाणें ज्यांच्याजवळ १०० एकरांहून अधिक जमीन आहे अशा खातेदारांचें प्रमाण १०० : १ इतकें आहे. मात्र त्यांच्या मालकीची जमीन १५ टक्के इतकी आहे. श्रम करणाऱ्या किंवा करूं इच्छिणाऱ्या लोकांना न्याय व काम द्यावयाचें तर जमिनीची कमाल मर्यादा ठरवून बाकीच्या जमिनीची वांटणी करणें किती आवश्यक आहे हें यावरून स्पष्ट होतें.

### उत्पादनाच्या पद्धतीचा
### व वांटपाचा व्हावा तसा विचार नाहीं

पण कांहीं झालें तरी सध्यांचे जमिनीचे लहान तुकडे मोठे केल्याशिवाय शेतीच्या उत्पादनांत खरी वाढ होणें शक्य नाहीं, ही गोष्ट अटळ असल्यामुळें योजनाकारांनींच अखेरचा म्हणजे सहकारी शेतीचा मार्ग सुचविला आहे. प्रत्येक गांवांत एक 'ग्राम उत्पादन-मंडळ ' स्थापन करावयाचें व समग्र गांव सहकारी शेतीसाठीं एक घटक मानावयाचा अशी

ही योजना आहे. पण येथेंहि नियोजन-मंडळानें कांहीं निश्चित व करारी धोरण स्वीकारलेलें आहे असें म्हणतां येत नाहीं. शेतीची ही पुनर्घटना घडवून आणण्यासाठीं कायद्याच्या सक्तीच्या तत्त्वाचा अंगीकार करण्याची नियोजनकारांची तयारी दिसत नाहीं. आणि स्वेच्छेनें सहकारी शेतीची गति गोगलगायीची गति असते असा आजपर्यंतचा अनुभव आहे. अशा स्थितींत हा आदर्श गांठण्याला किती काळ लागेल हें सांगणें कठिण आहे. मध्यंतरींच्या काळांत अन्नाच्या उत्पादनांत वाढ करण्याची जी निकड ती भागविली गेली नाहीं तर देशांत जी बिकट परिस्थिति उत्पन्न होईल, तिला कसें तोंड द्यावयाचें हा प्रश्न शिल्लकच राहतो. शिवाय नियोजनसमितीनें जी सहकारी शेतीची पद्धति सुचविली आहे तींत आजचे मालकी हक्क कायम ठेवले असून मालकांना त्याबद्दल योग्य मोबदला मिळेल अशी तरतूद केलेली आहे. तसेंच मध्यंतरींच्या काळांत अन्नधान्यवाढीच्या दृष्टीनें नियोजन-मंडळानें जी रजिस्टर्ड फार्म्सची योजना आंखली आहे त्यामुळें शेतीच्या उत्पादनांत फार मोठी वाढ न होतां उलट त्यामुळें शेतीच्या धंद्यांत भांडवलशाही प्रथा मात्र मोठ्या प्रमाणावर सुरू होण्याची भीति आहे.

सारांश, शेतीच्या काय किंवा उद्योगधंद्याच्या, काय, उत्पादनाची वाढ करणें हें एकमेव लक्ष्य डोळ्यांपुढें ठेवल्यामुळें या योजनेंत उत्पादनाच्या वांटपाचा व तिच्या पद्धतीचा व्हावा तसा विचार झालेला नाहीं. त्यामुळें भारताच्या राज्यघटनेंत ग्रथित केलेल्या उद्दिष्टांची-विशेषतः ' ज्या योगें समाजाचें अनहित होईल अशा प्रकारें संपत्तीचें व उत्पादनाच्या . साधनांचें केंद्रीकरण होणार नाहीं अशी अर्थव्यवस्था निर्माण करणें ' या उद्दिष्टाची परिपूर्ति कितपत होईल याबद्दल फार संशय वाटतो.

### योजनेच्या व्यवहार्यतेची कसोटी

शेवटीं आमची योजना क्रान्तिकारक नसून व्यावहारिक आहे, तेव्हां याच निकषावर ती तपासून पाहावी असें जें तिच्या जन्मदात्यांचें व चाहत्यांचें म्हणणें आहे त्याचा विचार करून हें दीर्घ समीक्षण संपवूं.

एखादी आदर्श व सुंदर योजना कागदावर लिहून काढल्यानें आमचें पोट भरणार नाहीं किंवा आमच्यापुढील प्रश्न सुटणार नाहींत हें जितकें खरें आहे, तितकेंच एखादी योजना व्यावहारिक आहे असें केवळ म्हटलें म्हणजे ती अंमलांत येईल हेंहि खरें नाहीं. कोणतीहि गोष्ट अंमलांत यावयाची तर तिच्या अंगीं असे कांहीं विशिष्ट गुण असले पाहिजेत कीं, ज्यामुळें ती लवकर सिद्धीला जाईल. कोणचेंहि कर्म सिद्ध होण्यासाठीं ' दैवं चैवात्र पंचमम् ' हें सोडलें तर सांख्यशास्त्राप्रमाणें ' अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् । विविधाश्च पृथक् चेष्टाः ' इतकीं कारणें लागतात. अर्थात् यांत कर्ता व त्याच्या वेगवेगळ्या हालचाली यांना पहिल्या प्रतीचें महत्त्व आहे हें सांगावयासच नको. कोठल्या प्रमाणांत किती साधनसामग्री एकत्र आणली म्हणजे उत्पादनाचीं कोणतीं टोकें ( targets ) गांठतां येतील, तसेंच विशिष्ट उद्दिष्टें साध्य करावयाचीं तर सर्वांत अमुक एक यंत्रणा कार्यक्षम व प्रभावी ठरेल असें नियोजनकारांनीं सांगितलें म्हणजे एखादी योजना अंमलांत आली किंवा येईल असें मुळींच नाहीं. हें सर्व अंमलांत आणणारीं जीं माणसें त्यांच्यामध्यें भरपूर उत्साह उत्पन्न करून त्यांना परस्परांच्या सहकार्यानें कामाला प्रवृत्त करण्याची शक्तीहि योजनेंत असली पाहिजे. विशेषतः लोकशाही राज्यांत, नियोजन ही एक सामाजिक प्रक्रिया असल्यामुळें, कोणतीहि योजना यशस्वी व्हावयाची तर तिला सर्वसामान्य जनतेचा भरपूर पाठिंबा व सहकार्य मिळालें पाहिजे. म्हणून कोणत्याहि नियोजनाच्या सिद्धीची खरी शाश्वती या गोष्टींतच आहे. तेव्हां पंचवार्षिक योजनेच्या व्यवहार्यतेची खरी कसोटी, ती सर्वसामान्य जनतेमध्यें जरूर तो उत्साह निर्माण करून जनतेचा जोरदार पाठिंबा व स्वेच्छापूर्वक सहकार्य मिळविण्यांत किती यशस्वी झाली आहे किंवा होण्याचा संभव आहे, हीच होय.

### ध्येयदृष्टीचा अभाव

आपल्या योजनेमुळें लोकांचें समाधान झालें आहे व त्यांच्यांत तिनें उत्साह निर्माण केला आहे असें नियोजनकारहि म्हणूं शकतील असें मला








वाटत नाहीं. याला अनेक कारणें आहेत. पण त्यां-पैकीं एक मुख्य कारण हें आहे कीं, आर्थिक व सामाजिक व्यवस्थेंतील मूलगामी प्रश्नांना बगल देऊन केवळ आजच्यापेक्षां अधिक उत्पादन काढणें एवढें मर्यादित उद्दिष्टच योजनाकारांनीं आपल्या डोळ्यांपुढें ठेवलेलें आहे. म्हणजेच ती योजना क्रान्तिकारक नाहीं. सरकारनें एक नियोजनमंडळ नेमावें अशी शिफारस त्याला करणारा जो ठराव कॉंग्रेस वर्किंग कमिटीनें पास केला त्यांत असें म्हटलें आहे कीं, " ज्या अनेकांगी अहिंसक क्रान्तीनें आपला देश स्वतंत्र झाला त्या अहिंसक क्रान्तीमधून जात असतां भारतीय जनतेच्या ध्येयचक्षूंसमोर आपल्या देशाचें एक स्फूर्तिदायक भविष्यकालीन चित्र सदैव खेळत होतें. भारतीय जनतेच्या ध्येयचक्षूंच्यावर खिळलेला होता तो आपला असा देश होता कीं, जेथून दारिद्र्य, बेकारी, अज्ञान, वैषम्य आणि पिळवणूक या गोष्टींचें उच्चाटन झालेलें असेल, जेथें प्रत्येक माणसाला आपापल्या बुद्धि-व-सामर्थ्यानुरूप काम मिळून सुसंस्कृत जीवन जगायला योग्य ती साधन-सामग्री त्याला उपलब्ध होईल. "

या ध्येयदृष्टी-( vision )नें भारलें जाऊन नियोजनकारांनीं ही योजना तयार केली आहे असें सामान्य जनतेला खरोखरी वाटत नाहीं. ज्या लोकांना ध्येयदृष्टि ( vision ) नसते त्यांचा नाश होतो.

---

## खळाळून वाहे ओढा !

काळ्याशार आभाळांत
घन श्रावण गर्जती
ओपुनिया जीवधारा
वसुंधरा नटवीती !
गांवकुशीचा लाडका
अंग अंग मुरडीत
खळाळून वाहे ओढा
गात गुंगून तालांत !

भर त्याचा ओढ त्याची
मन तटांत मावेना
मस्त संगीत ऐकून
एके जागीं राहावेना !
शुष्क माळहि हांसतो
हिरव्या गालांतल्या गालीं
उडे मनांत पांखरूं
मोरपंखी सोनसळी !

—राजा मंगळवेढेकर












प्रा. त्र्यं. शं. शेजवलकर

# मराठ्यांचा इतिहास कितीसा परिपूर्ण आहे ?

गतवर्षीं नागपूर इतिहासपरिषदेच्या निमित्तानें मध्यप्रदेशांतील मराठ्यांच्या इतिहासाच्या अनास्थेबद्दल एक त्रोटक लेख ' नवभारतां ' त ( जानेवारी १९५१ ) प्रसिद्ध झाला. त्याच वेळीं संपादकांनीं ही लेखमाला पुढें चालेल अशी टीप दिली होती. त्याप्रमाणें या विषयाची चालणा पुनः करीत आहों. यंदां भारतीय इतिहासपरिषद् सरदेसाई यांच्या अध्यक्षतेखालीं जयपुरास झाली. तेथें जमलेले महाराष्ट्रीय सभासद व्हाइस-चॅन्सेलर ग. स. महाजनी यांच्या येथें अल्पोपाहारासाठीं जमले असतां, मराठ्यांच्या इतिहासाचा प्रश्न अनौपचारिक रीत्या चर्चिला गेला असें कळतें. मराठ्यांना सर्व परप्रांतीय लुटारू समजतात, राज्यकर्ते म्हणत नाहींत, म्हणून खेद पावणाऱ्या मंडळींकडून या चर्चेचा प्रस्ताव केला गेला व या आपत्तीवर उपाय एक मराठा इतिहास-परिषद् म्हणून स्वतंत्र संस्था चालवावी, असाहि बूट निघाल्याचें समजतें. रोगाचें निदान बरोबर न झाल्यामुळें चिकित्सेबाबत असला आडमुठेपणा स्वीकारण्याची कल्पना सुचावी, हें क्रमप्राप्तच म्हटलें पाहिजे. या संबंधांत महाराष्ट्रांतील परिस्थिति प्रथम तपासली पाहिजे म्हणजे तेणेंकरून आपत्तीचें निदान ठरविण्यास सोपें होईल.

गेल्या पाऊणशें वर्षांत महाराष्ट्रांत जी देशभक्तीची लाट उसळली, वाढली व जिरली तिच्या साधनांपैकीं एक प्रमुख साधन मराठ्यांच्या इतिहासाबाबत झालेली जागृति हें होय. या जागृतीमुळें कांहीं अव्वल दर्जाचीं कार्यकर्तीं माणसें निर्माण होऊन त्यांनीं मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें इतर कोणत्याहि प्रांतांत मिळालीं नाहींत एवढीं शोधून काढलीं व प्रसिद्धहि केलीं. त्यामुळें मराठ्यांचा इतिहास केवळ ग्रँट डफवर अवलंबून न राहतां कांहीं प्रमाणांत सांगतां येऊं लागला. पुष्कळशा ढोबळ चुका वा गैरसमज त्यामुळें दूर झाले. पण या कार्यांत पडलेले लोक बहुधा देशभक्तीनें प्रेरित झालेले असल्यामुळें त्यांच्या इतिहासविषयक लेखनांत व मांडणींत वैगुण्य निर्माण झालें व तें कांहींसें त्या कालाकडे पाहतां साहजिकच होतें. या काळांत निर्माण झालेला बहुधा कोणीहि लेखक सर्व वाङ्मय अभ्यासून कार्यास प्रवृत्त झालेला नव्हता. हातांत जे थोडे कागद वेळोवेळीं येत त्यांवरच अवलंबून बरेचसें लिखाण करण्यांत आलें. या गोष्टीस संशोधकाग्रणी राजवाडेहि अपवाद नव्हते. मग इतरांची गोष्ट कशास बोलावी ? राजवाड्यांची सर्वांत गाजलेली प्रथम खंडाची विस्तृत प्रस्तावना याबाबत ठळक उदाहरण म्हणण्यास हरकत नाहीं. प्रस्तावनेंतील बराच भाग मुख्यतः सूचक म्हटला तरी त्यांतील ढोबळ चुकाहि विसरण्यासारख्या नाहींत. पण अखिलमहाराष्ट्र जनता त्या वेळीं देशभक्तीच्या एवढ्या पुरांत सांपडली होती कीं, त्यांतील या चुकाहि त्या पिढीच्या लक्षांत येऊं शकल्या नाहींत. सर्वच एक प्रकारच्या काल्पनिक इतिहाससंवेदनेंत मूढ झाले होते, तेथें सत्यासत्यविचक्षणा कोण करणार ? एका प्रकरणांतील एकपक्षीय पुरावा थोडासा हातीं लागला, तर त्यावर सर्व साम्राज्याची टोलेजंग ऐतिहासिक इमारत उठविण्यांत आली. ती कितीशी बळकट ठरणार ? पण भोळ्या भक्तांच्या भावनेनें ती अभंगच मानली गेली. त्या पिढीच्या ही गोष्ट लक्षांत आली नाहीं तर तें कांहींसें क्षम्य मानतां येईल. कारण इतिहाससंशोधन कशाशीं खातात हें त्या वेळीं बहुतेकजणांना कळत नव्हतें. राजवाड्यांसारखे लोकहि स्वतःच चांचपडत होते व प्रथम कल्पनेनें भारून घेऊन नंतर इतिहासलेखनास प्रवृत्त होत होते, हें त्यांच्याच लिखाणांतील पुराव्यावरून सिद्ध आहे. पण ते भ्रमिष्ट झाले होते तरी वावदूक नव्हते. जर ते वावदूक असते तर आपल्या चुका दडवण्याचें बौद्धिक सामर्थ्य त्यांजवळ निश्चित होतें. स्वतःसमोर असलेल्या अस्सल पत्रांतील निःसंदिग्ध साल डोळ्यांना चुकलेलें भासावें व तशी टीप राजवाड्यांनीं द्यावी याचें








कारण त्याच टीपेंत पुढें काढलेल्या उद्गारांवरून स्पष्ट होतें. ते उद्‌गार "गोविंदपंतांनीं अजूनहि हिशेब दिले नव्हते" हे होत. हा गोविंदपंत राजवाडयांच्या डोक्यांत पहिला खंड लिहितांना इतका संचरला होता कीं, त्यांचे डोळे अस्सल सत्याला खोटें मानूं लागले होते. १७६१ चें पत्र १७६० सालांत आणून त्यांनीं स्वतःच ठेवलें आणि वर "सरकारी पत्रांत साल चुकावें हें आश्चर्य आहे" असे उद्‌गार काढले ! म्हणजे गोविंदपंतांविरुद्ध निकाल निश्चित धरून नंतर कागदांची जुळणी करून त्यावर आरोप लागू करण्याची ही घिसाडघाई होती. अशा चार पत्रांच्या तारखा त्यांनीं बदलून पानिपतोत्तर पत्रें पानिपतपूर्व कालांत ठेविलेलीं आहेत. आणि त्यांवर लांबलचक टीप देऊन त्यांत आपल्या वर्ष बदलण्याच्या कल्पनेला संशोधकीय पुरावा शोधून काढण्यासाठीं "आरबी सन मृगापासून न मोजतां चैत्रापासून मोजावयाचा व शालिवाहन शकाशीं जुळता करून घ्यावयाचा, असा पेशव्यांचा व होळकरांचा विचार होता असें दिसतें" असा जावईशोध करून शेरा मारला आहे ! हें सर्व लिखाण दोन पिढया सर्व संशोधकांच्या पुढें असतां तें खोटें आहे किंवा त्यांत कांहीं चूक आहे असें कोणालाहि वाटलें नाहीं किंवा कोणाच्या नजरेस आलें नाहीं किंवा तर्कच करावयाचा तर नजरेस येऊनसुद्धां कोणीं तसें दाखवून दिलें नाहीं. याचा अर्थ काय समजावयाचा ? तर हाच कीं, अखिल महाराष्ट्र काल्पनिक खोटया इतिहासांत दंग होऊन राजवाडेप्रभृतींच्या लिखाणांत मिटक्या मारण्यांत गुंगला होता !

मराठयांच्या इतिहासांत राजवाड्यांच्या प्रस्तावनांनीं फार मोठा पराक्रम केला आहे व या पराक्रमाचे दुष्परिणाम मराठयांच्या अंगभूत दुर्गुणांइतके व ऐतिहासिक चुकांइतके महाराष्ट्राला बाधत आहेत. ज्याप्रमाणें राजकारणी महापुरुषाची चूक चिरकाल अनेक पिढ्यांना भोगावी लागते, तशीच प्रतिभावान् लेखनाचे दुष्परिणाम बहुतकाल समाजाला बाधतात. आमचें जुनें स्वराज्य असतांना जे स्वदोष आमच्या लक्षांत स्वबुद्धीनें आले नव्हते ते, स्वराज्य गेल्यानंतर ज्या पहिल्या दोन पिढ्या झाल्या, त्यांच्या कांहींसे लक्षांत आले होते. व तो क्रम तसाच पुढें चालता तर त्यांतून अवश्य ती वैचारिक सुधारणा निर्माण होऊन समाजाची गाडी प्रगतिपथावर चालू झाली असती. पण तिसऱ्या पिढीला जे प्रतिभावान् कार्यकर्ते पुरुष महाराष्ट्रांत उदयास आले, त्यांच्या अविचारी कार्यकर्तृत्वामुळें महाराष्ट्रेतिहास चुकीच्या पायावर व गृहीतकृत्यांवर उभारण्यांत आलेला आहे. हा डोलारा टिकण्यासारखा नाहीं. पण दुरभिमानामुळें ज्यांना तो टिकवून धरण्याची उमेद वाटते, अशांच्या डोक्यांतून, भारतीय इतिहासपरिषदेस गेले असतां तेथें एक मराठा इतिहासपरिषद् काढण्याची कल्पना स्फुरते.

## अलगपणाचा शहाणा सुखवाद !

व्यक्तींची सुस्थिति किंवा दुःस्थिति यांचा परिणाम त्यांच्या विचारावरसुद्धां सामान्यतः होत असतो. अर्थात् अशा माणसांना खरे इतिहासाभ्यासक वा विचारवन्त असें कधींहि म्हणतां येणार नाहीं. १८५७ सालचें बंड होऊन गेल्यानंतर ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या वर्तनांत जो फरक पडला व पूर्वींच्या सहानुभूति-व-सहकार्याऐवजीं अलगपणा धारण करून परके राज्यकर्ते म्हणून ताठ मानेनें वागण्याचा जो प्रकार रूढ झाला, त्याचा परिणाम साहजिक प्रजेवरहि झाला. ईस्ट इंडिया कंपनीचे इंग्रज अधिकारी व नोकर हे सामान्यांतून वर चढलेले लोक असत. लहानपणापासून येथील लोकांत मिसळून वागण्याचा सराव त्यांना झालेला असल्यामुळें येथील लोकांचीं सुखदुःखें त्यांना जास्त कळत. एतद्देशीयांशीं त्यांची पुष्कळशी वैयक्तिक मैत्रीहि जडे. या परिस्थितीला पोषक अशी तत्कालीन एतद्देशीयांचीहि मनःस्थिति होती. स्वराज्यांतील अराजकाची, गोंधळाची व घाणीची आठवण तत्कालीन लोकांत केवळ बुजालेली नव्हती. याचा परिणाम ब्रिटिश शान्ततेचा, ब्रिटिश सद्धेतूचा व अनुभवास येणाऱ्या सहकार्याचा त्यांच्या मनावर चांगला ठसा उमटण्यांत झालेला होता. त्यामुळेंच बाळशास्त्री जांभेकर, दादोबा पांडुरंग, लोकहितवादीप्रभृति माणसें त्या काळांत तशीं वागतांना दिसतात. याउलट त्याच काळांत पेशवाईतील आपलें उत्पन्न बुडाल्यामुळें खंक झालेले












भाऊ महाजनांसारखे समकालीन लोकहि ब्रिटिश राज्याविरुद्ध चिडलेले दिसतात. बंडानंतर उच्च परीक्षा पास होणाऱ्या सिव्हिल सर्व्हंटांची कारकीर्द सुरू झाली. हे लोक मुळांतच ऑक्सफर्ड-केंब्रिजच्या ताठमान्या लोकांतून निवडलेले असत. त्यांचा हेतु हिंदुस्थानचें कांहीं बरें करावें हा नसून स्वतःला मोठ्या पगाराची नोकरी मिळावी, स्वतःच्या शरीरास फारशी तोशीस न लागतां सामान्य राज्य-कारभार हांकून सुखानें कालक्रमणा करावी असा बेफिकीरीचा होता. या लोकांत मागच्या भल्या इंग्रज लोकांप्रमाणें एतद्देशीयांचें हित करण्याची बुद्धि नाहीं, असें म्हातारपणीं दादोबा पांडुरंग म्हणतांना आढळतात व अतःपर कोणी सरकारी नोकरीच्या मागें लागूं नये असेंहि कळूवणानें ते सुचवितात. याउलट नवीन इंग्रजी शिक्षणामुळें ज्यांना भराभर नोकऱ्या मिळाल्या व कष्टाचे, माधुकरीचे दिवस जाऊन जे मोठेपणास चढले, त्यांच्या मनांत या तात्पुरत्या स्वतःच्या भरभराटीमुळें भलताच आत्मविश्वास निर्माण झाला. या आत्मविश्वासाचें प्रमुख उदाहरण विष्णुशास्त्री चिपळूणकर हे होत. पण या आत्मविश्वासाबरोबर तत्कालीन इंग्रजांच्या अलगपणाचा, ताठमानेपणाचा व शहाण्या सुखवादाचा संसर्गहि या नवीन पिढीला बाधला. हिंदुस्थानांतील सामान्य प्रजेला उपयुक्त होईल असें शिक्षण देण्याचा वा प्रचलित करण्याचा मार्ग मागें पडून, जगन्नाथ शंकरशेठ स्कॉलर व भाऊ दाजी प्राइझमन् होण्याचा ध्येयवाद फैलावला ! आणि या शिक्षणाचें ध्येयहि मोठयांत मोठी नोकरी मिळविण्याचें साधन असें होऊन बसलें. पहिल्या दोन पिढ्यांतील शिक्षितांमध्यें ब्राह्मणेतरांचें जें प्रमाण व जो दर्जा आढळतो, तें प्रमाण व तो दर्जा त्या प्रमाणांत पुढें आढळत नाहीं. याचें कारण आम्ही असें समजतों कीं, पूर्वीं मराठीला प्राधान्य असून त्या भाषेंत शास्त्रीय विषयापासून सर्वांची निष्पत्ति व्हावी असा कटाक्ष होता. तो विश्वविद्यालयांतील इंग्रजी माध्यमाच्या व सरकारदरबारांतील त्याच भाषेच्या वरचष्म्यामुळें नाहींसा झाला. लेखनाचा हेतु वरच्या थोड्या—प्रमुखतः ब्राह्मणादि जातींच्या मनोरंजनाचा व आत्मप्रौढिपोषणाचा राहिला. शंकरशेटी संस्कृतीकरणामुळें भाषा मराठी संतकवींची बालबोध न राहतां उच्च पंडितांची होऊन बसली. साहजिकच बहुजनसमाज तिच्या फुलोऱ्यापासून दूर राहिला. त्याच्या शिक्षणाची आबाळ झाली व वाङ्मयांत वरच्या दहा टक्के प्रजेचें अंतरंग प्रतिबिंबित झालें. याचे दुष्परिणाम शिवशाहीनें निर्माण केलेल्या नूतन मराठ्यांच्या राष्ट्रांत ब्राह्मणेतर सत्यशोधक वा दलित-वर्ग असे पक्ष निर्माण होण्यांत दिसून येतात.

### ब्राह्मणत्वाचा अभिमान आणि तुटक वृत्ति

आणि हाच काळाचा झपाटा महाराष्ट्रेतिहा-सालाहि बाधला. मराठ्यांच्या इतिहासांतील ब्राह्मणांच्या भागालाच जास्त प्राधान्य देण्यांत आलें. हेंच काय, पण महाराष्ट्रेतिहासाची सरणीहि ब्राह्म-णांच्या इतिहासाला पोषक अशी न कळत लावण्यांत आली. राजवाड्यांच्या लिखाणांत ज्या कोलांट्या उड्या दृष्टीस पडतात त्यांचें हें एक प्रमुख कारण आहे. राजवाड्यांनीं शिवशाहीची सरणी प्रथम पायाशुद्ध लावली. पण पुढें पेशवाईचा काळ सुरू होतांच पेशवे हे शिवशाहीचेंच ध्येय पुढें चालवीत होते असा भ्रम त्यांच्या लिखाणानें निर्माण केला. त्यांच्या लिखाणांत प्रसंगानुरोधानें पेशव्यांविरुद्ध फुटकळ कोरडे कांहीं थोडे ओढलेले नाहींत. पण अखिल मराठेशाहीची सरणी लावण्यांत त्यांनीं ढोबळ चुका केल्या आहेत. त्यांच्यासारख्या प्रतिभावान् व कीस काढणाऱ्या पंडिताच्या हातून अशा चुका व्हाव्या, याचें कारण एकच व तें म्हणजे त्यांचा ब्राह्मणत्वाचा अभिमान. समाजाचें विवेचन करतांना त्यामुळें तुटक वृत्ति निर्माण झाली. या तुटक वृत्तीचा विशेष व स्वभावधर्म हाच आहे कीं, तीं-मुळें जास्त जास्त स्वतंत्र तुकडे निर्माण व्हावे. अखिलमहाराष्ट्रीय समाजांत ब्राह्मणांना प्राधान्य दिल्यानंतर मग त्यांत एक पाऊल पुढें टाकून कऱ्हाडे, चित्पावन, देशस्थ, सारस्वत असे भेद पाहणें हें ओघानेंच आलें. हिंदुस्थानांतील जातींत परस्परांत स्वभावधर्मांत कमीजास्त भिन्नता सर्वत्र आहे. पण इतिहासविवेचनांत या पार्श्वभूमीचा परिणाम कशा रीतीनें वर्णावयाचा याला कांहीं निर्बंध नाहीं. पानपतखंडाच्या गाजलेल्या प्रस्तावनेचीं जवळजवळ निम्मीं पानें गोविंदपंत बुंदेल्याची








इजेरी घेण्यांत खर्चीं पडलीं आहेत. पत्रें त्याचींच उपलब्ध झालीं असल्यामुळें एका दृष्टीनें हें योग्यच असें वाटेल. पण त्यांत भ्रामिष्टपणा निर्माण होऊन अस्सल पत्रांच्या तारखा चुकीच्या लावून त्यावरून आपला मुद्दा सिद्ध करण्याचें प्रयोजन नव्हतें. राजवाड्यांनीं हा जो चुकीचा पाया घालून दिला तो आजतागायत महाराष्ट्र-इतिहासाभ्यासक मंडळी चालवीत आहेत. जातीचा आरोप करणें स्वतःलाच लज्जास्पद वाटत असल्यामुळें 'कोणाच्या तरी चुकीनें पानिपत बुडालें' असा शब्दप्रयोग रूढ झाला आहे आणि तो इतका खोलवर पोंचला आहे कीं, पुणें विद्यापीठाच्या इतिहासशाखेचे प्रमुख, भारतीय इतिहासपरिषदेचे कारभारी व हिंदुस्थानचा सोपपत्तिक इतिहास दरवर्षी पुनर्मुद्रण करून विद्यार्थ्यांना शिकविणारे प्रा. ओतुरकर हे पानिपतावर सांगोपांग विवेचन करणारा स्वतंत्र ग्रंथ निर्माण झाल्यानंतरहि गोविंदपंत बुंदेल्यांवर राजवाड्यांचाच आरोप करण्यास कचरत नाहींत. यावरून असें वाटतें कीं, यापुढें कोणतींहि पुस्तकें संशोधनानंतर बाहेर आलीं तरी एकदां चुकीची लावलेली मराठ्यांच्या इतिहासाची सरणी तशीच पुढें चालविण्याचा महाराष्ट्र-पंडितांचा निश्चय आहे.

राजवाड्यांनीं पानिपतच्या लढाईचे परिणाम एकवीस कलमांत वर्णिले आहेत. त्यांत दोन कलमें, साताऱ्च्या छत्रपतीचें नांव समूळ नाहींसें व्हावयाचें तें झालें नाहीं व अब्दालीच्या जयामुळें त्याचें कांहींच साधलें नाहीं, अशीं आहेत. मराठेशाहीची इमारत कोणत्या चुन्याच्या चिकटपणामुळें राहिली तितपत तरी उभी राहूं शकली, याबद्दल राजवाड्यांचें केवढें अज्ञान या पहिल्या वाक्यांत दिसतें ! मुसलमानांच्या इतिहासाची सरणी दुसऱ्या वाक्यावरून त्यांना कितीशी समजली होती असें म्हणावें ? राजवाड्यांचें विवेचन किती परस्परविरोधी असतें, हें वरील एकवीस कलमांतील पुढच्याच एका कलमावरून स्पष्ट होतें व तें कलम म्हणजे 'साताऱ्ची व कोल्हापूरची गादी जोडण्याचें काम तहकूब झालें' हें होय. जर साताऱ्च्या छत्रपतीचें नांवच समूळ नाहींसें करावयाचें होतें तर ती गादी कोल्हापूरच्या गादीशीं जोडण्याचें काम कोठें उरणार होतें ? अब्दाली या पुरुषानें त्याच्या आधीं अस्तित्वांत नसलेलें अफगाणिस्तान हें एक स्वतंत्र राष्ट्र आपल्या कर्तबगारीनें निर्माण केलें. म्हणजे तो वस्तुतः शिवाजीच्या वर्गांतील ऐतिहासिक पुरुष होय. त्याच्या पराक्रमामुळेंच हिंदुस्थानांतील इस्लामचा पगडा कायम राहण्यास मोठी मदत झाली. दिल्लीचे नामधारी बादशहा, निजाम, हैदर, अयोध्येचे नबाब, कर्नाटकांतील महमद अल्ली, फार काय, इंग्रजांच्या ताब्यांत गेलेले देशद्रोही मीरजाफराचे वंशज बंगालचे नबाब, हे बराच काळ जिवंत राहिले व त्यांच्या अस्तित्वामुळें इंग्रजांना मराठ्यांचें साम्राज्य वेढण्यास व मोडण्यास सोपें गेलें. राजवाड्यांच्या विवेचनावरून स्पष्ट होतें कीं, त्यांना हिंदुस्थानांतील इस्लाम व त्याच्याशीं झगडण्यासाठीं निर्माण झालेलें महाराष्ट्र-राज्य या दोहोंचीहि उपपत्ति नीटशी कळली नव्हती.

**मराठ्यांच्या इतिहासाचा स्वतंत्र काल आहे का?**

हिंदुस्थानच्या इतिहासांत मराठ्यांच्या इतिहासाचा एक स्वतंत्र काल आहे कीं नाहीं असा महत्वाचा पण महाराष्ट्रियेतरांनीं कबूल न केलेला एक मुद्दा अजूनहि विवाद्यावस्थेंत आहे. न्यायमूर्ति रानड्यांनीं याबाबत आद्य प्रयत्न इंग्रजी माध्यमांत केला. पण ही मांडणी पुढील इतिहासकारांनीं अवलंबिलेली दिसत नाहीं. केंब्रिज इतिहासमालेंत किंवा सर यदुनाथांसारख्या प्रमुख इतिहासकारांच्या ग्रंथांत हें वर्गीकरण अनुसरलेलें नाहीं. भारतीय इतिहासपरिषद् पुण्यांतील भा र त - इ ति हा स - सं शो ध क - मं ड ळा कडून अस्तित्वांत आणण्यांत आली, तरीहि तिच्या कार्यक्रमांतील विभागरचनेंत मराठ्यांच्या इतिहासाचा स्वतंत्र निर्दिष्ट कालखंड समाविष्ट होऊं शकलेला नाहीं. आणि ही स्थिति दत्तोपंत पोतदारांसारखे झुंजार व वाक्पटु राजकारणी संशोधक त्या संस्थेंत प्रमुख असतां ! म्हणजे ही गोष्ट कोठें तरी खटकते असा याचा अर्थ होतो. ती गोष्ट कोणती ? तर ती हीच कीं, मराठ्यांच्या स्वतंत्र राज्याला पेशवाईंत जी बाळाजी विश्वनाथी कलाटणी मिळाली ती. शिवाजीनें दिल्लीपतीचें माहात्म्य नाहींसें करून त्याला प्रतिस्पर्धी अशी हिंदु छत्रपतीची संस्था प्रतिष्ठित केली. पण








ताराबाईऐवजीं शाहूची तळी उचलून शिवाजीनंतर महाप्रयासानें टिकविलेली ती संस्था बाळाजी विश्वनाथाच्या स्वातंत्र्येच्छु सरदारांना मराठी राज्याचे घटक बनविण्याच्या कल्पनेमुळें कोसळून पडली. न्यायमूर्ति रानड्यांनीं बाळाजी विश्वनाथाच्या कार्याचें चुकीचें पण गोंडस वर्णन करून, त्याच्या ह्या कामगिरीबद्दल त्याला प्रतिभावान् म्हणून संबोधून शिवाजीनंतरचा मराठ्यांच्या संयुक्त राज्याचा संस्थापक असें त्याचें गुणवर्णन केलें आहे. पण न्यायमूर्तींच्या लक्षांत आलें नाहीं तें हें कीं, शिवाजी हा एकछत्री राज्याचा पुरस्कर्ता होता. आपल्याइतक्याच पराक्रमी व बरोबरीच्या सरदारांनाहि तो आपल्या राज्यांत स्वतंत्र स्थान देण्याच्या विरुद्ध होता. अमात्य आपल्या राजनीतींत, राजसत्तेव्यतिरिक्त इतर कोणाचेंहि शासन प्रजेस तिळमात्र बाधूं नये, अशी शिवाजीची राज्यनीति होती असें निक्षून सांगतात. मुसलमानी राज्यपद्धतीपासून शिवाजी हा धडा शिकला होता. मोगल बादशाहींत ज्याप्रमाणें कोणताहि सरदार केवढ्याहि मोठ्या अधिकारावर चढला व श्रीमंत झाला, तरी तो स्वतंत्र राज्यकर्ता होऊं शकत नसे व त्याची संपत्ति तो मेल्यानंतर सरकार आपल्या ताब्यांत घेई, तोच कित्ता शिवाजीचा होता. ही गोष्ट अमात्यांच्या राजनीतींत स्पष्ट करण्यांत आली आहे. पण न्यायमूर्ति स्वतः दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानिकांच्या प्रदेशांत लहानाचे मोठे झाले व त्या प्रदेशांत ब्राह्मणांच्या राज्याबद्दलचे गैरसमज चांगलेच प्रचलित होते. हा मूळचा संस्कार त्या विचारी पुरुषासहि झटकून टाकतां आला नाहीं, इतकी त्या संस्काराची ब्राह्मणजातीवरील पकड महाराष्ट्रांत कायम झाली होती. हिंदुस्थानांत पूर्वापार 'छप्पन देशचे राजे' अशी शब्दयोजना रूढ झाली होती. तिचे दुष्परिणाम शिवाजीच्या लक्षांत आले होते व म्हणूनच त्यानें इस्लामी संस्कृतींतील राजसत्ताविषयक भाग आत्मसात् करून त्या वळणानें नवी छत्रपतिसंस्था आरंभिली होती. युरोपांत सरंजामदारांच्या सरदारी संस्थेमुळें जे अनर्थ निर्माण झाले होते व जे नाहींसे करण्यांत राजांना अनेक शतकें झगडावें लागले ते अनर्थ शिवाजी मुळापासूनच आपल्या राज्यांत दूर ठेवूं इच्छीत होता. या अनर्थांना मान्यता देऊन शिवशाही चालवूं पाहाणाऱ्या बाळाजी विश्वनाथाच्या शहाणपणाची प्रत कोणती लावावयाची ? त्यानें आणलेल्या स्वराज्याच्या (?) सनदांचा खरा अर्थ कोणता ? तर मराठे हे मांडलिक सत्ताधीश होऊन, त्यांच्याच सनदा घेण्याच्या मुत्सद्देगिरीमुळें दिल्लीपतीची इस्लामी संस्था हिंदुस्थानांत चिरंतन झाली हा ! जर सन १८३६ पर्यंत, मराठ्यांचें साम्राज्य होऊनहि, फारसी ही हिंदुस्थानांतील राजभाषा म्हणून चालली व दिल्लीच्या बादशहाचें नाणें हेंच अखिल हिंदुस्थानांत सर्वत्र प्रचलित राहिलें हाच खरा इतिहास आहे, तर मराठ्यांच्या राज्याचा स्वतंत्र काल तो कोठें उरला ? व त्यांच्या इतिहासाला स्वतंत्र कालखंड संबोधून वेगळें स्थान देण्याचें कारण तें कोणतें ?

### इतिहासाचा खोटा अभिमान

मराठी राज्याच्या उदयाची मीमांसा न्यायमूर्तींनीं लावली तशी त्याच्या अपकर्षाची मीमांसा त्यांकडून लिहिली गेली नाहीं. पण त्यांनीं पेशव्यांच्या रोजनिशांना जी प्रस्तावना लिहिली आहे त्यांत या गोष्टीचें थोडें दिग्दर्शन आहे. शिवाजीच्या राजनीतीचीं सूत्रें उत्तर पेशवाईंत सुटलीं व जातिभेदामुळें फुटीरपणा निर्माण झाला, या गोष्टींनीं स्वराज्याची घडी विस्कळित झाली, असा न्यायमूर्तींच्या लिहिण्याचा रोख आहे असें पुढील एक अव्वल दर्जाचे विवेचक दत्तोपंत आपटे आपल्या लिखाणांत म्हणतात. पण एवढी गोष्टहि आपट्यांना मंजूर नाहीं. त्यांच्या मतें शिवाजीचा हेतुहि वंशपरंपरा अधिकारी नसावे असा नव्हता, व जातिभेदाचें कलमहि आपट्यांनीं केळकरांच्या प्रमाणेंच परिस्थितीची व कालौघाची चर्चा करून गैरलागू ठरविलें आहे. पण या सर्वांच्या विवेचनाच्या मागचें एकच कारण आणि तें म्हणजे, आपले पूर्वज पेशवाईंत चुकले हें कबूल करण्याचें जिवावर येत होतें व प्रचलित काळांत या विवेचनामुळें महाराष्ट्रसमाजांतील आपलें स्थान त्याचा ऐतिहासिक पाया ढासळल्यामुळें डळमळीत होईल अशी त्यांना वाटणारी भीति, हेंच होय. यावरून त्यांच्या देशभक्तीचें










खरें स्वरूपहि उघड होतें. ही खोटी देशभक्तीच महाराष्ट्रांतील मराठ्यांच्या इतिहाससंशोधनाला, विवेचनाला व लेखनाला बाधली आहे व तीच, अनेक वरच्या दर्जाचे त्यागी पुरुष निर्माण होऊनहि, महाराष्ट्र समाज विस्कळित ठेवण्यास समर्थ झाली आहे. मागील इतिहासाचा खोटा अभिमान व प्रचलित मनूंतील स्वतःच मानलेली आपली आत्मप्रतिष्ठा, याच गोष्टी प्रामुख्यानें गेल्या तीस वर्षांत महाराष्ट्राला बाधल्या आहेत. त्यामुळें राजकारणांत ते चुकीचा मार्ग अवलंबून मागें पडले आहेत व अजूनहि असले दुरभिमान सोडण्याची त्यांची तयारी दिसत नसल्यामुळें, महाराष्ट्रसमाज विस्कळित राहून बलवान् व संघटित असा नूतन महाराष्ट्र निर्माण होण्यास अडथळा होत आहे असें आम्हांस वाटतें. यावर उपाय स्वतंत्र मराठा-इतिहासपरिषद् निर्माण करणें हा नसून, आपलें मन शुद्ध व साफ करणें हाच होय.

राजवाड्यांचें सर्व लिखाण तात्पुरत्या मनांत भरलेल्या मुद्द्यांच्या समर्थनार्थ होत असे, ही गोष्ट त्यांच्या लिखाणाचें आलोडन करून तिचा तुलनात्मक अभ्यास केल्यानें समजण्यासारखी आहे. राजवाड्यांचा दुसरा एक विशेष म्हणजे पूर्वी एकवार चर्चिलेल्या व ठासून मांडलेल्या विधानाकडे ते पुनः कधीं वळत नसत वा त्यावर दृष्टिक्षेप करीत नसत हा आहे. एकदां शिवाजीची जन्मतारीख त्यांनीं ठरविली. पण पुढें नवीन तारीख पुढें आल्यावर त्यावर आपलें मत कधीं प्रसिद्ध केलें नाहीं. एकदां पानपतावर लिहिलें. पण मागाहून प्रसिद्ध झालेल्या माहितीवरून आपल्या मतांत दुरुस्ती करणें अवश्य आहे असें त्यांस वाटलें नाहीं. एखाद्या विषयावर एकटाकी लिखाण करून तें जलद प्रसिद्ध होईपर्यंत त्या विषयांत त्यांचें डोकें काम करी. नंतर तें त्यांच्या गांवींहि नसे. आपल्या चुका कबूल न करण्याचा हट्टीपणा व एकंदर विचारांत एककल्लीपणा हे त्यांचे गुण लोकप्रसिद्धच आहेत. तात्कालिक विचाराच्या फेऱ्यांत ते किती झपाटले जात, हें त्यांच्या अखेरच्या विस्तृत प्रस्तावनांवरून सिद्ध आहे. ' राधामाधवविलासचंपू ' व ' महिकावतीची बखर ' यांना लिहिलेल्या विस्तृत प्रस्तावना त्यांच्या परिपक्व बुद्धीचें फल होय. पण त्यांतहि त्यांचा मूळ स्वभाव झांकला जाऊं शकला नाहीं. अशांच्या मतानें प्रचलित केली गेलेली महाराष्ट्रतिहाससरणी आजहि विश्वविद्यालयांतून संस्कारक्षम विद्यार्थ्यांना शिकविली जावी, ही अत्यंत देशहानिकारक गोष्ट होय. मराठी भाषा म्हणून त्यांचा उपयोग करतांनाहि त्यांतील लिखाणाचा दुष्परिणाम विद्यार्थ्यांच्या मनावर बिंबतच राहतो. योग्य रीतीनें आकलन करतां आला तर इतिहासाभ्यासासारखा उपकारक व हितकारक अभ्यास दुसरा नाहीं. पण अयोग्य रीतीनें तो शिकविला वा समजला गेला, तर त्यासारखा उपद्रवकारक व नाशकारक अभ्यासहि दुसरा नाहीं. खोट्या इतिहासाचे परिणाम काय होतात हें जर्मनी व इटली यांच्या गेल्या पिढींतील इतिहासावरून स्पष्ट झालें आहे. हिट्लर आणि मुसोलिनी यांना देशोद्धारक महापुरुष समजून त्यांचें अनुकरण इकडे करण्यांत आलें व हा विषय अजूनहि अनेकांच्या मनांत घर करून बसलेला आढळतो. महाराष्ट्रसमाज तिभंगला ठेवण्यास या गोष्टी कशा सहायभूत होत आहेत हें प्रस्तुत निवडणुकीच्या धुळवडींतसुद्धां निदर्शनास आलें आहे. तत्त्वें वा नीतिअनीति खुंटीवर ठेवून तात्पुरत्या व वैयक्तिकयशाचे मार्ग चोखाळण्याचा मनु त्यामुळें सुरू झाला आहे. समाजांतील इतिहासशिक्षण योग्य मार्गावर आणल्याशिवाय या अनवस्थेस पायबंद बसण्यासारखा नाहीं. दिवंगत राष्ट्रसंघानें असा प्रयत्न चालविला होता. इतर देशांतहि तसा उपक्रम करण्यांत आलेला होता व त्याचे कांहीं सुपरिणामहि झाले होते. दुसऱ्या महायुद्धानंतर इंग्लंड व जर्मनीमध्यें पुनः या विषयांचा उपक्रम झाला आहे. विशेषतः इतिहास-शिक्षक या विषयांत लक्ष घालीत आहेत. कोणत्याहि देशांतील इतिहासांत इतर देशाबद्दल खोटें, चुकीचें, अतिरंजित वा प्रक्षोभकारक विधान करण्यांत येऊं नये यासाठीं, प्रत्येक देशांतील शालोपयोगी इतिहास इतर देशांत पाठवून त्यांतील ऐतिहासिक विधानांबद्दल चर्चा करण्यांत येते. उभयानुमतें खरीं ठरविलेलीं विधानें इतिहासलेखकांना पुरविण्यात येतात व तदनुसार त्यांनीं आपल्या लिखाणाची मांडणी करावी अशी अपेक्षा

असते. अशासारखा प्रयत्न हिंदुस्थानांतील प्रांतांत—पाकिस्तान धरून—व्हावा हें परम इष्ट आहे.

## इंग्रजांची दूरदृष्टि आणि ब्राह्मणांची कोती बुद्धि

जोंपर्यंत इंग्रजांचें परकी राज्य चालूं होतें तोंपर्यंत, आपसांतील फूट त्यांच्या लक्षांत येऊं नये व अशा फुटीचा उपयोग त्यांस आपल्याविरुद्ध करतां येऊं नये म्हणून. या विषयाची चर्चा राजकारणदृष्ट्या टाळण्यांत येत असे. हा नाजुक प्रश्न आहे असें समजून तो हळु स्वरांत क्वचित् कुजबुजण्यांत येई. पण अशी काळजी बहुधां फक्त ब्राह्मणच घेत. मराठ्यांना त्या काळीं फारशी वाचा फुटली नव्हती. पण जी थोडी फुटलेली दिसते ती ब्राह्मणांविरुद्धच दिसते. ब्राह्मणांच्या मतें अशी गोष्ट केवळ इंग्रजांच्या चिथावणीमुळें होते अशी होती. त्यांच्या मनांत असें आलें नाहीं कीं, आपले दुर्गुण याला कारणीभूत होतात. इंग्रज अधिकारी आपलें राज्य टिकविण्यासाठीं झटत असावे यांत टीकास्पद तें काय ? ती केवळ साहजिक व राजकारणांतील स्पष्ट गोष्ट होती. पण यांतील पायाभूत गोष्ट जी ब्राह्मण व मराठे यांतील मतभेद व हितभेद, ती आजकालची गोष्ट नव्हे. इंग्रजांचा वकील मॅलेट पुण्यांत येऊन बसला तेव्हां त्याच्याहि ही गोष्ट ताबडतोब लक्षांत आली होती. त्या काळीं येथें इंग्रजांचें राज्य नसून आपलेंच होतें. पण इंग्रजांनीं इतक्या दूरच्या काळीं जी गोष्ट हेरली, ती दीडशें वर्षांनंतर अजूनहि आपल्या लक्षांत येत नाहीं, लक्षांत येत असली तरी कबूल करवत नाहीं, कबूल करावी लागत असली तरी मन त्याप्रमाणें वागण्यास तयार होत नाहीं. अनेकांचें मन तयार झालें तरी सामाजिकदृष्ट्या त्याला आवश्यक अशी कृति घडून येतांना दिसत नाहीं, अशी आपली स्थिति आज आहे. "ब्राह्मण आपली सत्ता चालवून मराठ्यांना खालीं ठेवण्यास झटत आहेत व मराठे त्यांच्या हातांतून निसटण्यास पाहात आहेत" असें पेशवाईचें वर्णन तिच्या ऐन अमदानींत मॅलेटनें केलें. मराठ्यांच्या साम्राज्याचे हे दोन मोठे घटक आहेत असेंहि तो म्हणतो. ब्राह्मणांच्या सत्तेचीं त्यानें सांगितलेलीं कारणें अजूनहि तितक्या प्रमाणांत नसलीं तरी चालूं आहेत. लेखणीची, उद्योगाची व कार्यकुशलतेची ब्राह्मणांची सत्ता त्यांच्या धार्मिक वरिष्ठपणाबरोबरच आजतागायत चालत आलेली आहे. पण पेशवाई कोसळल्यानंतर त्यांची राज्यसत्ता मात्र चालेनाशी झाली व इंग्रजी राजवटीचा शिल्लक राहिलेला परिणाम म्हणजे अशी त्यांची सत्ता यापुढें कधींहि चालूं नये अशी त्यांनीं सुरू करून दिलेली विचारसरणी व राज्यसरणी होय. इंग्रजी राजवटींतवरील गुणांच्या जोरावर ब्राह्मणांच्या हातांत नोकर म्हणून का होईना, बरीचशी सामाजिक सत्ता होती व तिचा थोडाबहुत राजकीय उपयोगहि त्यांस करतां येत असे. पण आतां इंग्रजांनीं या देशांत 'दर डोई एक मत' अशी लोकसत्तावादी विचारसरणी रुजवून ठेवल्यानंतर आणि तिच्या जोरावर राज्यसत्ता पूर्णपणें मराठ्यांच्या हातांत गेल्यानंतर, ब्राह्मणांची सत्ता ती कितीशी शिल्लक राहणार ?

ब्राह्मणांच्या राज्याविरुद्ध हातीं धरण्यास लायक म्हणून मराठे सरदार मॅलेटनें सुचविले होते. त्यांपैकीं महादजी शिंदे व मुधोजी भोसले यांचा उपयोग इंग्रजांनीं त्या काळींच करून घेतला होता. पण सर्व प्रतिस्पर्ध्यांत कोल्हापूरकर छत्रपति जास्त लायक; हें मॅलेटनें १७८८ सालीं सुचविलेलें कुळ आजतागायत इंग्रजांना पुरलें ! यावरून इंग्रजांची दूरदृष्टि व ब्राह्मणांची कोती बुद्धि दोन्हीहि स्पष्ट होतात. आमच्या कांहीं दुर्गुणांत हिंदु म्हणून आलेले कांहीं दुर्गुण आहेत व ते अखिल हिंदुस्थानांत सर्वसामान्य आहेत. पण आज इतिहास प्रत्यक्ष बाधत असेल तर तो मात्र मराठ्यांनाच. साम्यवादाचा वरवंटा फिरवून सर्वच सपाट करून या देशांतील प्रश्न सुटणार असेल तर वेगळें ! एरवीं अशा सुधारणेखेरीज महाराष्ट्राचा प्रश्न सुटण्याला आवश्यक अशी साफ वाट होणें दुरापास्त आहे. ऐतिहासिक अडथळ्यांतील मराठे संस्थानिक गेले, तरी त्यांचा कायम प्रतिस्पर्धी जो निजाम व धर्मवैरी जे पोर्तुगीज ते जातांना दिसत नाहींत ! या गोष्टीची दखलहि इतिहासदृष्ट्या घ्यावी लागेल. एरवीं मराठ्यांचा इतिहास परिपूर्ण होणारच नाहीं.

---










स्टीफन झ्वाइग. अनुवादक : श्री. स. शं. देसाई.

# जुळ्यांचें घर

एकदां मी दक्षिणेंतील एका शहरांतून —ह्या शहराचा मी येथें नामनिर्देश करूं शकत नाहीं.— हिंडत असतां एका रस्त्यावर एक अद्वितीय आणि भव्य दृश्य पाहून जागच्या जागीं खिळलों. मध्ययुगीन स्थापत्याची ती एक अप्रतिम इमारत होती. त्या इमारतीवर दोन उंच मिनार उभारण्यांत आले होते आणि त्या मिनारांमध्यें इतकें विलक्षण साम्य होतें कीं, मावळत्या सूर्याच्या सौम्य प्रकाशांत एक मिनार जणूं दुसऱ्या मिनाराची छायाच वाटे !

ती इमारत कोठल्याहि धर्ममंदिराची नव्हती, किंवा मध्ययुगीन कालांतील एखाद्या राजवाड्याचीहि नव्हती. मात्र तिच्याकडे जरा निरखून पाहिलें असतां एकाद्या जोगिणीच्या मठाची आठवण होई. तथापि तिची बांधणी इतकी भरभक्कम आणि कलाकुसर इतकी सुरेख होती कीं, तीहि शंका ताबडतोब नष्ट होई. त्या इमारतीकडे मी बराच वेळ पाहत होतों. इतक्यांत जवळच एका पानगृहाच्या गच्चीवर मला एक इसम कांहीं तरी पीत बसलेला दिसला. मी लगेच त्या इसमाकडे गेलों आणि त्या प्रांतांतील रीतिरिवाजांप्रमाणें डोक्याची टोपी काढून त्याला अभिवादन करीत म्हटलें : " कृपा करून आपण मला ह्या इमारतीविषयींची माहिती सांगाल का ? " तो प्रश्न ऐकतांच त्या इसमानें माझ्याकडे डोकें वर करून आश्चर्यचकित नजरेनें पाहिलें आणि तो किंचित् हंसत हळूच म्हणाला, " त्या इमारतीविषयींची खात्रीलायक माहिती मलाहि नाहीं. परंतु एक मात्र खरें कीं, ह्या शहरामध्यें ती इमारत अर्थपूर्ण नांवानें ओळखली जाते. ' जुळ्यांचें घर ' असें तिला संबोधीत असतात. कदाचित् त्या दोन्ही मिनारांतील साम्यामुळेंहि तिला...... "

त्यानें माझ्याकडे पाहून स्मित केलें आणि तो गप्प राहिला. माझी उत्कंठा किती अनिवार आहे हें तो पाहत होता. हळूहळू आमचें संभाषण सुरू झालें. त्यानें माझ्यासाठीं मद्य मागविलें. मी त्याचे आभार मानले. इतकें होईतों सूर्यास्त होऊन चंद्रोदय कधींच झाला होता. माझी दृष्टि सहजच त्या अद्भुतरम्य इमारतीकडे वळली. त्या तिन्ही सांजांच्या संधिप्रकाशांत त्या इमारतीच्या मिनारांना अवर्णनीय शोभा प्राप्त झाली होती.

आमचें संभाषण वाढतच गेलें आणि त्याचें स्नेहभावांत रूपान्तर झालें. इतकें झाल्यावर त्या इसमानें आपोआपच त्या इमारतीची हकीगत कथन करण्यास सुरुवात केली. ती हकीगत इतकी विलक्षण होती कीं, ती येथें सांगण्याचा मोह मला आवरत नाहीं. जशीची तशी नसली तरी शक्यतों प्रयत्न करून मी ती येथें कथन करीत आहे.

त्या वर्षीं ॲक्विटानियाचा राजा थिऑदोरिक ह्याच्या फौजांचा तळ ह्या शहरांत पडला होता. तो तळ इतका लांबला कीं, सैनिकांनाहि त्याचा कंटाळा आला आणि ते मोहिमेवर जाण्या-

---

सुप्रसिद्ध लेखक स्टीफन झ्वाइग याच्या Gemias desiguaes या नांवाच्या पोर्तुगीज भाषेमध्यें प्रसिद्ध झालेल्या गोष्टीचा स्वैर अनुवाद.

साठीं चुळबूळ करूं लागले. परंतु हा मुक्काम इतका दीर्घ काल टिकण्यास तसेंच एक प्रबळ कारण होतें. थिऑदोरिकचा सेनापति हेरिलुं ह्याचें निकृष्ट जातींतील एका सुंदर तरुणीवर प्रेम बसून तो तिच्याशीं विवाहबद्ध झाला होता. त्या तरुणीचें शहराच्या मंडईंत मधाच्या रोट्या आणि मिठाई विकण्याचें एक लहानसें दुकान होतें. तिथेंच ती हेरिलुंच्या दृष्टीस पडली होती व तिच्या सौंदर्यावर तो लुब्ध होऊन, तिच्या जात-कुळीकडे लक्ष न देतां त्यानें तिच्याशीं विवाह केला होता.

शहराच्या मुख्य चौकांतील एका बादशाही वाड्यांत तीं दोघें राहात होतीं. तेथें तीं प्रणयक्रीडेंत इतकीं दंग होऊन गेलीं होतीं कीं, जगांत काय चाललें आहे ह्याचेंहि त्यांना भान नव्हतें. परंतु तीं जरी जगाला विसरून गेलीं असलीं, तरी काळ कांहीं झोंपला नव्हता. एके दिवशीं दक्षिणेचे उष्ण वारे वाहूं लागले, बर्फ वितळूं लागलें आणि वृक्ष-लतांना बहर आला. वसंत-ऋतूचें आगमन झालें होतें. आतां हेरिलुंला मुक्काम हलविल्या-शिवाय गत्यंतरच राहिलें नाहीं. परंतु तरीहि त्याला आपल्या पत्नीच्या सहवासापासून दूर व्हावें असें वाटत नव्हतें. इतका तो तिच्या प्रेमानें पागल झाला होता. एके रात्रीं हेरिलुं आपल्या प्रेयसीच्या बाहु-पाशांत सुखनिद्रेंत मग्न असतां, भल्या पहांटेस त्याच्या वाड्याच्या दिंडीदरवाजावर धक्के बसल्यानें तो खडबडून जागा झाला. डोळे चोळीत तो बाहेर येऊन पाहातो, तों राजाचा एक दूत त्याची वाट पाहत असलेला त्याला दिसला. त्या जासुदानें आणलेला खलिता त्यानें वाचून पाहिला. राजानें त्याला तत्काळ फौजांची छावणी हलवून सरहद्दीकडे कूच करण्याचा हुकूम फर्माविला होता. रणवाद्यें वाजूं लागलीं, पताका हवेंत फडकूं लागल्या, आणि घोड्यांच्या टापांचा आवाज आणि खिंकाळणें ह्यांनीं सारें आसमन्त व्यापून गेलें. त्या आवाजानें हेरिलुंची वीरश्री जागृत झाली. लष्करी विजयाच्या महत्वा-कांक्षेपुढें प्रणयाचा पराभव झाला. त्यानें आपला रणवेष धारण केला आणि आपल्या पत्नीला कडकडून आलिंगन देऊन तिला त्या भव्य प्रासादांत एकटी सोडून तो मुसलमानांच्या मोहिमेवर निघून गेला. तिनें डोळ्यांत अश्रू आणून आपल्याला बरोबर नेण्याची परोपरीनें विनवणी केली. पण त्या अश्रूंनीं त्याचें मन वळलें नाहीं. एकामागून एक अशा सतत सात लढायांमध्यें त्यानें मुसलमानांचा पुरता निःपात केला आणि त्यांना समुद्रापार हांकून लावलें. असा विद्युत्-विजय त्यानें कधींच संपादन केला नव्हता! अर्थात् अशा महान् पराक्रमी सेनानीची त्याच्या राजानें खुशामत करावी ह्यांत नवल तें कसलें? आणि राजा थिऑदोर ह्यानें हेरिलुंच्या काम-गिरीचें साजेसेंच चीज केलें. त्यानें मुसलमानांकडून जो प्रदेश कबीज केला होता तो सगळा प्रदेश त्याला त्यानें जहागीर म्हणून बहाल केला. आतां हेरिलुंच्या तुफानी घोडदौडीला अडथळा करण्याचें सामर्थ्य कुणाच्या अंगीं राहिलें नाहीं. त्याच्या घोड्याचें उड्डाण हीच ॲक्विटानियाची सरहद्द समजली जाऊं लागली. परंतु त्या विजयामुळें हेरिलुं भयंकर उन्मत्त झाला. राजा थिऑदोरिक ह्याचा मांडलिक म्हणून राहण्यास त्याला कमीपणा वाटूं लागला. ॲक्विटानियाच्या राजमुकुटाचीं सुखस्वप्नें तो पाहूं लागला. आपली प्रिय पत्नी राणीच्या पोषाखांत राजसिंहासनावर आरूढ झालेली त्याला अंतश्चक्षूंसमोर दिसूं लागली. आणि तसें पाहिल्यास त्या आसुरी महत्वाकांक्षेपासून त्याला परावृत्त करण्याची कुणाची प्राज्ञा होती? त्याची समशेर त्याच्या शत्रूंना पाणी पाजण्यास समर्थ नव्हती का?—पण नाहीं. प्रारब्धानें हेरिलुंच्या अदृष्टांत निराळेंच भवितव्य लिहून ठेवलें होतें. आपल्या योजनेप्रमाणें राजाला पदच्युत करण्याकरितां त्यानें बंड पुकारतांच त्याच्या इमानी फौजांनीं त्याचे हुकूम अंमलांत आणण्याचें नाकारलें. त्या आपल्या राजाला एकनिष्ठ राहिल्या. त्यामुळें हा कट उघडकीस आला. झालें! कालचा शूर सेनापति आज गुन्हेगार ठरला! राजानें त्याला पकडण्याचे हुकूम सोडले. लढाई-पूर्वींच पराभूत झालेला, धर्मानें वाळींत टाकलेला आणि सैनिकांनीं त्यजिलेला हेरिलुं डोंगरांमध्यें पळून गेला. परंतु तेथेंहि त्याच्या दुर्दैवानें त्याचा पिच्छा सोडला नाहीं. त्याला पकडून देण्याऱ्याला राजानें बक्षीस जाहीर करतांच त्या डोंगराळ







भागांतील जंगली लोकांनीं हेरिलूंला ठार केलें.

ज्या वेळीं राजाचे शिलेदार हेरिलुंचें शिर घेऊन राजधानीकडे दौडत येत होते, त्याच वेळीं त्याची पत्नी त्याच्या वाड्यामध्यें प्रसूत होऊन दोन जुळया मुलींना जन्म देत होती. तिला बिचारीला ह्या घटनांचा थांगपत्ताहि नव्हता ! शहराच्या बिशपनें त्या दोन्ही मुलींना स्वहस्तें बाप्तिस्मा दिला आणि त्यांची हेलेन आणि सोफिया अशीं नांवें ठेवलीं. ह्या समारंभास शहरांतील मोठमोठे प्रतिष्ठित नागरिक उपस्थित होते. धर्ममंदिरांत घंटा वाजत होत्या. बारशाची मेजवानी ऐन रंगांत आली होती. तोंच हेरिलूंच्या बंडाची व त्याच्या मृत्यूची बातमी तेथें येऊन थडकली. राजदूतांनीं हेरिलुंची सगळी मालमत्ता जप्त झाल्याची वार्ता त्याच्या पत्नीला विदित केली. बिचारी हेरिलुंची बायको ! तिचें ऐश्वर्य औटघटकेचेंच ठरलें. राजानें पतीची धनदौलत जप्त केल्यानें ती निष्कांचन आणि निराधार बनली. आणि फिरून तिच्या नशिबीं मधाच्या रोट्या आणि मिठाई विकणें आलें. परंतु तिच्या दुर्दैवानें त्या वेळीं ती एकटी नव्हती. तिच्या पदरीं दोन बालकें होतीं व त्यांचा प्रतिपाळ तिला करावयाचा होता. एका बाजूनें पतीच्या मृत्यूचें दुःख, दुसऱ्या बाजूनें मुलांच्या पालनपोषणांच्या जबाबदारीची चिंता आणि त्यांतच एके काळीं तिच्या ऐश्वर्याचा हेवा करणाऱ्या लोकांची कुत्सित बोलणीं, ह्यामुळें तिला जीवन नकोसें झालें. तिचें सौंदर्य नष्ट झालें. केसांवर रुपेरी छटा मारूं लागली आणि भर तारुण्यांतच ती जख्ख म्हातारी दिसूं लागली.

परंतु ह्या दरिद्री जीवनांतहि तिला थोडासा दिलासा मिळत होता. आणि तो म्हणजे तिच्या जुळया मुलींचा आनंद. त्या दोन्हीहि मुलींनीं आपल्या आईचें अप्रतिम सौंदर्य हुबेहूब उचललें होतें. त्यांचे चेहरे आणि अवयव ह्यांमध्यें इतकें विलक्षण साम्य होतें कीं, हेलेन कोणती आणि सोफिया कोणती हें कळणें कठिण जाई. खुद्द त्यांच्या आईला देखील कधीं कधीं हा संभ्रम पडे. त्यामुळें पुढें सोफिया आपल्या हाताला एक खुणेचा दोरा बांधूं लागली. ज्या प्रमाणें त्या जुळ्या बहिणींमध्यें आईचें असामान्य सौंदर्य उतरलें होतें, त्याचप्रमाणें त्यांच्या पराक्रमी पित्याचे महत्त्वाकांक्षा, धाडशी वृत्ति आणि हुकुमाची तृष्णा हे गुणावगुणहि त्यांच्या रक्तांत उतरले होते. त्यांची बुद्धि कुशाग्र होती. त्यामुळें त्यांनीं अल्पावधींतच स्त्रियांच्या सगळ्या कला आत्मसात् केल्या. लवकरच बुद्धिमत्ता आणि सौंदर्य ह्यांमध्यें त्या दोन्ही बहिणींची बरोबरी करणारी एकहि मुलगी सबंध ऑक्विटानियामध्यें सांपडेनाशी झाली. मात्र एक गोष्ट खरी कीं, त्यांच्या गरीब आईनें काबाडकष्ट करून त्यांना हें खानदानी मुलींचें शिक्षण दिलें असलें तरी, त्यामुळें त्या सुखी मात्र झाल्या नाहींत. कला आणि ज्ञान ह्यांमुळें जगांतील सगळ्या सुंदर गोष्टींचा परिचय झाल्यानें आपल्या आईच्या निकृष्ट दर्जाची आणि तिच्या अडाणी संस्कृतीची त्यांना शरम वाटूं लागली. आपल्या चंद्रमौळी घराच्या पडवींत बसून मधाच्या रोट्या आणि मिठाई विकणाऱ्या आपल्या आईकडे पाहून त्यांना मनस्वी दुःख होई. आपल्यासारख्या सुसंस्कृत मुलींना दारिद्र्यांत जीवन कंठावें लागत असलेलें पाहून त्या नशिबाला दोष देत. रात्रंदिवस त्यांना एकच निदिध्यास लागला होता— आपण श्रीमंत व्हावें, त्या दरिद्री जीवनापासून पळून जावें !

एके दिवशीं एक विलक्षण प्रकार घडला. सोफिया नेहमींसारखी सकाळीं उठून पाहाते तर तिची बहीण हेलेन आपल्या अंथरुणांत नव्हती. रात्रींच्या काळोखाची संधि साधून ती पळून गेली होती यांत तिळमात्रहि शंका नव्हती. हेलेन बेपत्ता झालेली पाहून तिची आई घाबरली. आणि शहरकोतवालींत जाऊन तिनें ही खबर दिली व आपल्या मुलीचा तपास करण्याची कोतवालाला विनंति केली.

परंतु दुसऱ्या दिवशीं शहरामध्यें अशी एक खळबळजनक वार्ता पसरली कीं, ती ऐकून त्या बिचाऱ्या दुर्दैवी आईनें शरमेनें मान खालीं घातली. हेलेन एका उमरावपुत्राबरोबर पळून गेली होती. त्या तरुणानें तिच्यासाठीं आपल्या बापाच्या तिजोरीवर डल्ला मारला होता. ह्या बातमीला एक आठवडा लोटतो न लोटतो तोंच आणखी एक खेदजनक बातमी आली : हेलेन आपल्या प्रियकराबरोबर त्याच शहरांत राहात होती. तिच्या








प्रियकरानें तिच्यासाठीं एक भव्य प्रासाद भाड्यानें घेतला होता व ती त्यांत नोकर-चाकर, शरीररक्षक, शिकारी कुत्रे आणि दुर्मिळ पक्षी ह्यांसह विलासी जीवन कंठीत होती. त्या वार्तेचें चर्वितचर्वण होऊन नागरिकांचीं तोंडें दुखतात न दुखतात तोंच त्याहूनहि एक भयंकर वार्ता प्रसृत झाली. हेलेनला आपल्या पोरगेल्या प्रियकराचा कंटाळा येऊन ती एका म्हाताऱ्या उमरावाबरोबर राहावयास गेली होती. तो म्हातारा इतका जख्ख होता कीं त्याला पाहून दफनभूमीची आठवण व्हावी ! परंतु तो फार श्रीमंत आणि कद्रू होता. पण हेलेनच्या लुसलुशीत तरुण शरीराच्या स्पर्शसुखासाठीं त्यानें आपल्या तिजोरीचीं दारें मोकळीं सोडलीं होतीं आणि ह्या उच्छृंखल तरुणीनें ह्या सोन्याच्या बदकाचीं सगळीं पिसें उपटून झाल्यावर त्याला टाकून दिलें होतें. पुढें ती त्याहूनहि श्रीमंत अशा दुसऱ्या एका उमरावाबरोबर राहावयास गेली होती. तें ऐकून त्या दुर्दैवी आईच्या दुःखाला पारावारच राहिला नाहीं. आपल्या कक्षाबाहेर गेलेल्या मुलीला तिनें निरोपावर निरोप पाठवून आपल्या पराक्रमी पित्याच्या नांवाला अशा रीतीनें काळिमा न फांसण्याची विनंति केली. परंतु हेलेनचा स्वैराचार कांहीं कमी झाला नाहीं. उलट एके दिवशीं तिच्या आईच्या कानीं अशी एक वार्ता पडली कीं, हेलेन थाटाच्या लवाजम्यानिशीं शहरांतून चालली आहे. भरजरी पोषाख केलेले शिलेदार, तिच्यामागून चालणारे पायदळाचे सैनिक, पर्शियन कुत्र्यांचा एक कळप आणि दुर्मिळ माकडें ह्यांच्यामधून हेलेन चालली होती. तिचा दिमाख एवढा मोठा होता कीं, जिच्या नांवानें ती ओळखली जात होती, आणि जिच्यासाठीं मानवी रक्ताच्या नद्या वाहल्या होत्या व साम्राज्यें रसातळास गेलीं होतीं, ती 'ट्रॉय'ची हेलेन, किंवा जेरुसलेममध्यें प्रवेश करणारी 'साबा'ची राणी यांचाहि लवाजमा त्या लवाजम्यापुढें फिका पडावा ! ती मिरवणूक पाहाण्याकरितां सारें शहर लोटलें होतें ! तो लवाजमा शहराच्या मंडईसमोर येऊन पोंचतांच त्याबरोबर असलेले घोडेस्वार आणि पायदळाचे सैनिक एका रांगेंत उभे राहिले व त्यांनीं हेलेनला सलामी दिली. मेण्याचे पडदे दूर झाले व सौन्दर्य आणि तारुण्य ह्यांनीं रसरसलेली हेलेन मोठ्या डौलानें मंद पावलें टाकीत ज्या प्रासादांत एके काळीं तिचा पिता वास्तव्य करीत होता व ज्यांत तिचा जन्म झाला होता, त्याकडे निघाली. तिच्या एका प्रियकरानें तिच्या तीन रात्रींच्या सहवासाच्या मोबदल्यांत तो प्रासाद तिच्यासाठीं विकत घेतला होता. त्या प्रासादांत राहावयास आल्यावर हेलेनचें ऐश्वर्य दिवसेंदिवस अधिकच वृद्धिंगत होत गेलें. तिच्या स्पर्शसुखाचा आस्वाद घेण्याकरितां देशोदेशींचे लक्ष्मीपुत्र तिच्याकडे येऊं लागले. ते लोक सर्व जातींचे आणि सर्व धर्मांचे होते. ख्रिश्चन, पॅगन, ज्यू, आस्तिक, नास्तिक ! तिच्या मायावीपणापासून खुद्द ॲक्विटानियाचा युवराज देखील सुटला नाहीं. अर्थात् हेलेनच्या ह्या अनाचाराबद्दल शहरांतील सभ्य लोकांना वाईट वाटत नव्हतें असें नाहीं. ते तिचा तिटकारा करीत. विशेषतः कुलीन आणि खानदानी स्त्रियांना तर तिची भयंकर किळस वाटे. धर्मोपदेशक तिला शाप देत. पतिव्रता, विधवा, परित्यक्ता सगळ्या प्रकारच्या स्त्रिया तिला लाखोल्या वाहत. वेश्याव्यवसायांतील मुरळी आणि वृद्ध वेश्या तर हेलेनला पाण्यांत पाहात. त्या तिचा भयंकर मत्सर करीत. पण ह्या सगळ्या लोकांमध्यें तिचा अधिक मत्सर आणि अधिक द्वेष कोण करीत असेल तर तिची सख्खी बहीण सोफिया. सोफियाला हेलेनचा मत्सर वाटे तो तिनें वेश्याव्यवसायावर अलोट संपत्ति मिळविली आणि ती ऐषआरामांत राहात होती म्हणून नव्हे, तर हेलेन प्रथम ज्या उमरावपुत्राबरोबर पळून गेली होती तो उमरावपुत्र तिचा (सोफियाचा) प्रियकर होता म्हणून. त्या तरुणाचें सुरुवातीला सोफियावर प्रेम होतें. पण तिनें त्याच्या प्रेमयाचनेला नकार दिल्यानें तो हेलेनच्या जाळ्यांत सांपडला होता. व त्याचें पर्यवसान अखेरीस तिच्या पलायनांत झालें होतें.

हेलेनप्रमाणें सोफियाहि कांहीं कमी महत्त्वाकांक्षी नव्हती. तिलाहि विलासी जीवनाची आसक्ति वाटत होती. पुरुषांनीं आपल्या सौन्दर्याचे भाट बनावें व सदैव आपल्या भोंवतीं लाळ घोटावी असें तिला वाटे. तिची ही रूपाकांक्षा हेलेनला माहीत असल्यानें

तिला खिजविण्याकरितां कधीं कधीं ती तिच्याकडे उंची नजराणे पाठवून देई. पण सोफिया त्यांचा स्वीकार न करतां हेलेनकडे ते परत पाठवून देई. हेलेनविषयीं सोफियाच्या मनांत एक प्रकारची मत्सरी भावना निर्माण झाली व हेलेनवर आपणांस कशी मात करतां येईल याच विचारांत ती सदैव गर्क होऊं लागली. अशा रीतीनें पुष्कळ दिवस विचार केल्यावर सोफियाला एके दिवशीं कळून चुकलें कीं, हेलेनवर आपणांस मात करतां येण्यासारखी आहे. पुरुषाच्या पापी दृष्टीपासून आपल्या कौमार्याचा जो बहुमोल ठेवा आपण जतन करून ठेवला आहे, त्याचा ह्या कामीं आपणांस उपयोग करतां येईल. तो विचार मनांत येतांच तिनें तो तात्काळ अंमलांत आणण्याचें ठरविलें. हेलेनच्या वेश्याजीवनाबद्दल लोकांची जहरी टीका अजून थांबली नव्हती, तोंच एके दिवशीं शहरामध्यें एक विलक्षण वार्ता पसरली ! हेलेनची जुळी बहीण सोफिया हिला आपल्या बहिणीच्या स्वैराचारी जीवनाची किळस वाटून त्या-बद्दल प्रायश्चित्त घेण्याकरितां तिनें ह्या प्रापंचिक जीवनाचा त्याग करून पारमार्थिक जीवनाचा स्वीकार केला होता. दीनदुबळ्यांची व आजाऱ्यांची सेवा करणाऱ्या जोगिणीच्या पंथाची तिनें दीक्षा घेतली होती.

ह्या बातमीचें लोकांनीं चांगलेंच स्वागत केलें. जो तो सोफियाची मुक्तकंठानें स्तुति करूं लागला व तिच्याकडे आदरानें पाहूं लागला. ती जेव्हां जोगिणीच्या शुभ्र पोषाखांत पायाकडे दृष्टि लावून मान खालीं घालून रस्त्यांतून जाई, तेव्हां स्त्रिया गुडघे टेकून तिला अभिवादन करीत व लहान मुलें तिच्या झग्याचें चुंबन घेत !

त्यानंतर ॲक्विटानियाच्या क्षितिजावर दोन तारे एकाच तेजानें शेजारीं शेजारीं तळपूं लागले. एक पापाचा तर दुसरा पुण्याचा !

ह्या वार्तेनें हेलेनेहि कमी अस्वस्थ झाली नाहीं. आपल्या बहिणीनें आपल्यावर मात केली असल्याचें तिला वाटूं लागलें. परंतु ती अजून हरली नव्हती. आणि ज्याप्रमाणें दोन प्रतिस्पर्धी परस्परांवर प्राणांतिक टोला हाणण्याकरितां अखेरच्या संधीची वाट पाहात असतात, त्याचप्रमाणें त्याहि दोघी तशाच संधीची वाट पाहूं लागल्या.

एके दिवशीं सोफिया आपली सायंप्रार्थना आटोपल्यावर हेलेनकडे गेली. हेलेननें आपला घृणा-स्पद धंदा सोडावा म्हणून तिला उपदेश करणें हा तिचा तिच्याकडे जाण्याचा उद्देश होता. हेलेनची त्या वेळीं वेषभूषा चालली होती. तिच्या दासी तिची वेणीफणी करीत होत्या व तिच्या सुंदर आणि सुकुमार देहलतेला सुवासिक अत्तरें लावीत होत्या. हेलेननें आपल्या बहिणीचा उपदेश फारच हास्यवदनानें श्रवण केला. पण आंतून मात्र ती तिच्यावर चिडली होती. तिच्या ह्या लुडबुडीचा तिला भयंकर संताप आला होता. तिला कशी घालवून द्यावी, कांहीं तरुणांना खोलींत बोलवावें कीं काय, ह्याविषयीं तिचा विचार चालला असतां अकस्मात् एकादी माशी गुं ऽ गुं ऽ करीत उठावी त्याप्रमाणें तिच्या सुपीक डोक्यांत एक विलक्षण आणि भयंकर विचार आला ! तो सैतानी विचार सुचतांच तिला एक प्रकारचें स्फुरण चढलें व तिला हास्याच्या उकळ्यावर उकळ्या फुटल्या. तथापि तें हास्य कसेंबसें आवरून तिनें आपल्या संभाषणाचा नूर पालटला. आपल्या दासींना तिनें खोलींतून घालवून दिलें. बनविण्याच्या कलेंत प्रवीण असलेली ती वारयोषिता चेहरा एकदम निरागस करून खोल आवाजांत आपल्या बहिणीला म्हणाली :

" माझ्या पतित जीवनाची मला शरम वाटत नाहीं, असें का तुला वाटतें ? ह्या लाजिरवाण्या जीवनाचा त्याग करून साधें प्रामाणिक जीवन कंठावें अशी मला फार फार इच्छा होते. परंतु पुरुषाच्या पापी वासनेपुढें माझ्या मनोनिग्रहाचा निभाव लागत नाहीं. तूं निश्चयी आहेस. पापाचा प्रभाव केवढा असतो, ह्याची तुला कल्पना नाहीं. कोणतीच अनुभवी स्त्री पुरुषाच्या आकर्षणाचा प्रतिकार करूं शकत नाही. तूं सुखी आहेस कारण पुरुषांच्या आक्रमक आणि अत्याचारी वृत्तीपासून तूं दूर आहेस. परंतु त्या अत्याचारांमध्येंहि एक प्रकारचें सुख असतें हें नाकबूल करून चालणार नाहीं. आणि त्या सुखासाठींच केवढीहि निग्रही स्त्री आपल्या इच्छेविरुद्ध बळी पडते ! "

हेलेनचा तो कबुलीजबाब ऐकून सोफिया आश्चर्यचकित झाली. कारण तिच्यापासून तिनें ती अपेक्षा केली नव्हती. पण लगेच तिनें आपल्या प्रवचनास सुरुवात केली. ती म्हणाली : "पापाविषयीं घृणा वाटणें ही पुण्यजीवनाची पहिली पायरी आहे. तुझ्यावर ईश्वरी दया होण्याची वेळ समीप आली आहे. माणसाची इच्छाशक्ति प्रबल असेल तर तें वैयक्तिक भावनेवर विजय मिळवूं शकतें. मात्र त्याच्या अंगामध्यें सत्प्रवृत्ति निर्माण झाली पाहिजे."

हेलेननें अपराधी मनानें मान खालीं घातली व ती म्हणाली, "अशा गोष्टी मीं पुष्कळ ऐकल्या आहेत. आणि त्याबद्दल मला आनंदहि झाला आहे. परंतु देवानें पुरुषांना स्त्रियांपेक्षां अधिक बलवान् केलें आहे. इतकेंच नव्हे तर स्त्रियांपेक्षां ते बुद्धिमान्हि अधिक आहेत. ह्याच देणगीमुळें ते प्रेमाच्या युद्धांत विजयी होतात." तिनें एक लांब उसासा सोडला अन् ती पुनः म्हणाली, "कोणतीच स्त्री पुरुषाचें आकर्षण आणि त्याच्या हिकमती यांचा प्रतिकार करूं शकत नाहीं. इतकी ती दुबळी असते! मला तर असें एकहि उदाहरण माहीत नाहीं कीं, एखाद्या पुरुषाचें एकाद्या स्त्रीवर मन जडलें असतां त्याच्या प्रेमाचा तिनें प्रतिकार केला आहे." तें ऐकतांच सोफियाचा अहंकार एकदम डिवचला गेला आणि ती आवेशानें म्हणाली : "असें तूं कां म्हणतेस हेंच मला कळत नाहीं. पुरुषाच्या पापी वासनेचा प्रतिकार करणाऱ्या माझ्यासारख्या खंबीर स्त्रीचें उदाहरण बस् नाहीं का ? हे लांडगे मला किती उपद्रव देतात ह्याची तुला कल्पना होणार नाहीं. ते माझा आमच्या मठापर्यंत पाठलाग करतात आणि रात्रीं त्यांच्या प्रेमपत्रांचा माझ्या बिछान्यावर एवढा मोठा ढीग पडलेला असतो कीं, तीं वाचण्यासहि मला वेळ पुरत नाहीं. ते माझी किती विनवणी करतात, किती भरमसाट आमिषें दाखवितात...! परंतु आंजपर्यंत मीं एकाहि पुरुषाकडे नजर वर करून पाहिलेलें नाहीं. ह्याचें कारण माझी प्रबल इच्छाशक्ति. पुरुषांची पापी नजर तिचा भेद करूं शकत नाहीं. तूं म्हणतेस तें मला पटत नाहीं. स्त्रीचें मन जर खंबीर असेल तर ती आपल्या शीलाचें रक्षण करूं शकते, हें मी माझ्या अनुभवावरून सांगतें."

"तूं त्यागी जीवन पत्करलें आहेस" हेलेन आपल्या बहिणीकडे खोट्या आदरानें पाहत म्हणाली, "तशांत तुझा स्वभावच मुळीं इतका करडा आहे आणि तुझ्यामागें कार्याचा व्याप एवढा मोठा आहे कीं, पुरुषांच्या ह्या चेष्टितांकडे लक्ष देण्यास तुला फुरसतच होत नाहीं. शिवाय, तुझ्याभोंवतीं इतर जोगिणींचाहि पहारा असतो. त्यामुळें तूं माझ्यासारखी असुरक्षित नाहींस. मात्र, तुझ्या ह्या शीलसंवर्धनाचे सगळें श्रेय तुला आहे असें तूं समजूं नकोस. तुला जर एकादा सुंदर तरुण भेटेल तर तूं तुझा निग्रह कुठवर पाळशील हें पाहाण्याजोगें आहे!"

"नाहीं. नाहीं. कालत्रयींहि शक्य नाहीं." सोफिया निश्चयानें म्हणाली, "माझी इच्छाशक्ति किती बळकट आहे हें मी तुला प्रत्यक्ष दाखवूं शकेन." झालें! हेलेनचा डाव फत्ते झाला. तिला सोफियाकडून हाच जबाब हवा होता. आपल्या कारस्थानांत ती गुरफटलेली पाहून तिला कमालीचा आनंद झाला आणि तिनें जेव्हां म्हटलें कीं, "तूं हें मला प्रत्यक्षांत दाखविणार नाहींस तोंपर्यंत माझा त्याच्यावर विश्वास बसणार नाहीं" तेव्हां तर सोफियाचा अभिमान अधिकच डिवचला गेला आणि ती त्या प्रयोगास ताबडतोब तयार झाली.

"ठीक आहे" हेलेन निर्विकार चेहऱ्यानें म्हणाली, "मध्यरात्रीं माझ्याकडे सिल्व्हांडर ह्या नांवाचा एक सुंदर तरुण येणार आहे. ह्या देशांतील अप्रतिम समजल्या जाणाऱ्या सुंदर स्त्रियांनीं त्याला स्वतः होऊन आपलें प्रेम अर्पण करण्याची इच्छा दर्शविली आहे. असें असतां तो प्रथम माझ्याकडे येणार आहे. तो अठावीस मैलांवरून येणार आहे. माझ्या सहवासांत तो फक्त एकच रात्र घालविणार असून त्याच्या मोबदल्यांत तो मला सोन्याचे सात तुकडे आणि इतर मौल्यवान् वस्तू नजर करणार आहे. पण त्यानें मला जरी कांहींहि दिलें नसतें, तरी देखील मीं त्याचा स्वीकार केला असता व त्याचें प्रेम सोन्याच्या तुलेनें विकत घेतलें असतें! देवाने आपणां दोघींना इतकें समान रूप आणि समान








शरीरसौष्ठव दिलें आहे कीं, माझ्याऐवजीं जर उद्यां तूं सिल्व्हांडरच्या सहवासांत राहशील तर त्याला तुझी तिळमात्रहि शंका येणार नाहीं. मात्र त्या वेळीं मी लगतच्या खोलीमध्यें राहून तुझ्यावर पाळत ठेवीन. पण मी तुला पुनः बजावतें, माणसानें विषाची परीक्षा कधीं पाहूं नये. स्त्रियांचीं मनें मेणाचीं असतात. त्यांना थोडी आंच लागली कीं तीं तावडतोब वितळून जातात. त्यासाठीं तूं ह्या भयंकर प्रयोगापासून परावृत्त व्हावेंस हेंच बरें. तूं पराभव कबूल केलास म्हणून कांहीं बिघडणार नाहीं. ''

हेलेन—ती भयंकर पाताळयंत्री तरुणी—एका बाजूनें आपल्या बहिणीला त्या धोक्याचा इशारा देत होती, तर दुसऱ्या बाजूनें तिच्या अभिमानास आह्वान देत होती. त्यामुळें सोफियाला तें आह्वान स्वीकारणेंच भाग पडलें. तिनें दुसऱ्या रात्रीं सिल्व्हांडरच्या सान्निध्यांत राहण्याचा आपला मनोदय प्रगट केला. परंतु तत्पूर्वीं तिला एका गोष्टीची आवश्यकता होती. यदाकदाचित् सिल्व्हांडरनें बलात्कार करण्याचा प्रयत्न केला तर त्यापासून आपलें रक्षण करण्याकरितां तिला एका खंजिराची आवश्यकता होती. तें ऐकून हेलेनच्या ओंठांवर मिस्किल हास्य विलसलें आणि तिनें ही मागणी तावडतोब मान्य केली. आणि नंतर सोफिया दुसऱ्या रात्रीं येण्याचें कबूल करून आपल्या मठाकडे निघून गेली.

सोफिया निघून गेल्यावर हेलेन स्वस्थ बसली नाहीं. कामशास्त्रांत आणि पुरुषांना भुलविण्याच्या कलेंत निपुण असलेल्या त्या तरुण वेश्येनें उद्यांच्या द्वंद्वाची जय्यत तयारी सुरू केली. तिनें आपल्या मुदपाकखान्यावरील मुख्य आचाऱ्याला बोलावून घेतलें आणि दुसऱ्या दिवशीं कामवासना उद्दीपित करणारीं जीं जीं म्हणून पक्वान्नें असतील तीं पकविण्याचा त्याला हुकूम केला. तेवढ्यानेंहि तिचें समाधान झालें नाहीं. तिनें मद्यामध्येंहि कामोत्तेजक द्रव्यें मिश्रित केलीं. कामकलेंत प्रवीण असलेली ती मायावी स्त्री तितक्यावरच थांबली नाहीं, तर दुसऱ्या दिवशीं तिनें असे कांहीं वृंदवादक बोलाविले कीं, त्यांच्या संगीतामुळें कुणाच्याहि भावना तरल व्हाव्या ! दुसऱ्या दिवशीं रात्र पडल्यावर सोफिया वचनाप्रमाणें हेलेनकडे आली. दारांतच तिचें हेलेनच्या दासीनें स्वागत केलें. त्यांनीं तिला एका दिवाणखान्यांत नेलें. तेथें अगोदरच तिच्या स्नानाची सगळी तयारी करण्यांत आली होती. तें स्नान साधें नव्हतें. उंची अत्तरें आणि सुवासिक वनस्पतींचें उटणें यांचें तें अभ्यंग स्नान होतें. त्या दासीनें तिचे जोगिणीचे कपडे उतरविले व तिचें अंग गुलाबाच्या पाकळ्या आणि सुगंधी तेलें ह्यांनीं मर्दन करण्यास सुरुवात केली. त्या मर्दनामुळें तिचें अंग सुगंधानें दरवळूं लागलें. तिच्या रोमरंध्रांतून रुधिर सळसळूं लागलें. नंतर त्या दासींनीं तिला कोमट पाण्याची आंघोळ घातली. हळुवार हातांनीं तिचें अंग पुसलें व पुनः तिच्या अंगाला कमलपुष्पांचें तेल लावलें. नंतर तिच्या अंगावरून मांजराचें मऊ कातडें फिरविण्यांत आलें. त्यामुळें सोफियाला आपल्या अंगांतून ठिणग्या उडत असल्याचा भास होऊं लागला. थोडक्यांत, हेलेन प्रत्येक रात्रीं रतिक्रीडेची जी तयारी करी तीच तयारी हेलेनच्या दासींनीं सोफियासाठींहि केली. इकडे वृंदवादकांनीं आपलें कामोद्दीपक संगीतहि सुरू केलें. ह्या सगळ्या विलक्षण तयारीनें सोफिया भयंकर गोंधळून गेली. पण अंथरुणावर पडल्यापडल्या तिनें आरशामध्यें पाहिलें, तेव्हां आपलें अप्रतिम सौंदर्य पाहून ती मंत्रमुग्ध झाली. इतक्यांत हेलेन मांजराच्या पावलांनीं आंत आली. आणि आरशाशेजारी उभी राहून तिनें सोफियाच्या सौंदर्याची मुक्तकंठानें स्तुति करण्यास सुरुवात केली. इतकें होईतों सिल्व्हांडरच्या आगमनाची वेळ झाली. त्या दोघी बहिणींनीं एकमेकींना दृढालिंगन दिलें. एकीचें हृदय भीतीनें आणि आणि उत्कंठेनें धडधडत होतें, तर दुसरीचें दुष्ट आनंदानें व्यापलेलें होतें. हेलेन आली तशी चोरपावलांनीं निघून गेली. जातांना ती सोफियाला धीरानें वागण्याचा इशारा देण्यास विसरली नाहीं.

हें सगळें कारस्थान घडवून आणतांना हेलेननें प्रथम सिल्व्हांडरला विश्वासांत घेतलें होतें व त्याला सोफियाशीं चातुर्यानें व संयमानें वागण्यास सांगितलें होतें.











# जुळ्यांचें घर

सिल्व्हांडरनें खोलींत प्रवेश करतांच सोफिया थोडीशी चपापली आणि तिनें आपला खंजीर चांचपून पाहिला. पण तिला त्या खंजिराचा उपयोग करण्याची संधि मिळाली नाहीं. सिल्व्हांडर आला तो एकदम सोफियासमोर गुडघे टेकून तिला प्रणाम करून आदरानें एके बाजूस उभा राहिला. नंतर एका दासीनें तबकामधून लाल रंगाच्या रेशमी वसनामध्यें गुंडाळून आणलेला रत्नहार त्यानें हातांत घेतला व तें वसन आपल्या हातांनीं सोफियाला नेसविण्याची व तो हार तिच्या गळ्यांत बांधण्याची त्यानें तिच्याजवळ परवानगी मागितली. सिल्व्हांडरची ती शालीन वृत्ति पाहून सोफिया थक्क झाली. त्याच्या-कडून तिनें तशा वागणुकीची अपेक्षा केली नव्हती ! तिनें त्याला तें वस्त्र आपल्याला नेसविण्याची व तो हार आपल्या गळ्यांत बांधण्याची परवानगी दिली. रत्नहाराचा गारवा व तो गळ्यांत बांधतांना मानेला झालेला सिल्व्हांडरच्या बोटांचा स्पर्श ह्या परस्पर-विरोधी संवेदनांनीं सोफियाच्या अंगावर एकदम रोमांच उभे राहिले. पण त्यानंतर सिल्व्हांडरनें कोणतीच हालचाल केली नाहीं. तिच्याविषयीं वाटणारें प्रेम आणि त्यांतून प्रादुर्भूत झालेली विषयवासना व्यक्त करण्याऐवजीं तो ढोंगी तरुण तिच्यासमोर पुनः गुडघे टेकून म्हणाला, " आपल्यासारख्या सौंदर्यशालिनीबरोबर जेवण करण्याची मला लाज वाटते. माझे कपडे मळलेले आहेत. तरी आपण मला कपडे बदलण्याची परवानगी द्यावी." सिल्व्हांडरच्या लाघवी भाषणानें आणि त्याच्या आज्ञाधारक वृत्तीनें सोफियाचा मोठाच हिरमोड झाला. तिनें आपल्या दासींना हांक मारली व त्यांना सिल्व्हांडरला स्नानगृहाकडे नेण्याचा हुकूम केला. पण त्या दासींना हेलेननें अगोदरच सूचना दिल्या असल्यानें, त्या सूचनांनुसार त्यांनीं सोफियाचा हुकूम आपणांस न कळल्याचा बहाणा केला व सिल्व्हांडरचे कपडे त्याच दिवाणखान्यांत उतरविले.

सिल्व्हांडरचें तें नग्न सौंदर्य पाहून सोफियानें एकदम लाजेनें मान दुसरीकडे वळविली. पण तिला त्या शहरांतील मध्यचौकामध्यें असलेल्या अॅपोलोच्या पुतळ्याची आठवण झाल्याशिवाय राहिली नाहीं. तो पुतळा कुणीं तरी पॅगन धर्माच्या अमदानींत त्या चौकामध्यें उभारला होता व नंतर तो शहराच्या बिशपच्या आज्ञेवरून पाडण्यांत आला होता.

सिल्व्हांडरच्या नग्न देहाला दासीनें सुवासिक तेलाचें मालिश केलें व नंतर उंची अत्तरांनीं सुगंधित केलेल्या पाण्याची त्याला आंघोळ घालून त्याच्या अंगांत उंची कपडे चढविले. त्या नवोन्मेषी सौंदर्यानें सोफिया एकदम दिपून गेली व थोडा वेळ अनिमिष नजरेनें ती सिल्व्हांडरकडे पाहात राहिली. पण लगेच तिला आपला स्वतःचा राग आला व तिनें आपला खंजीर चाचपून पाहिला. पण तो खंजीर तिथून बाहेर काढण्याची तिला संधीच आली नाहीं. कारण तो सुंदर तरुण तिच्याशीं अतिप्रसंग करण्याऐवजीं इतकें लांब अंतर ठेवून बोलूं लागला कीं, तें पाहून सोफियाला आपल्या मठांतील भिक्षूंची आठवण झाली. सिल्व्हांडर गोगलगायीसारखा मऊ होता. त्याच्यामध्यें भावनांचें वादळ सुरू झाल्याचें कोणतेंच चिन्ह दिसत नव्हतें. थोडक्यांत सिल्व्हांडरचें ढोंग बेमालूम वठलें होतें. नंतर तीं दोघें जेवावयास बसलीं. त्या कामो-त्तेजक पदार्थांनीं आणि मादक मद्यानें सोफियाला नशा चढूं लागली. मद्याची विशेष संवय नसल्यानें तिच्या संवेदना हळूहळू उत्तेजित होऊं लागल्या. त्यांतच दिवाणखान्यामध्यें पसरलेल्या धूपदीपांचा व अत्तरांचा सुगंध व भावना तरल करणारें पार्श्वसंगीत ह्यांची भर पडली. सोफियाचा तिच्या देहावरचा ताबा हळूहळू सैल होऊं लागला. परंतु ती अजून बेहोष झाली नव्हती. तिला आपल्या प्रतिज्ञेची अजून आठवण होती. पण तो लबाड तरुण मात्र कोणतीच हालचाल करीत नव्हता. एका दृष्टीनें तो तिचा उपमर्दच होता. त्यामुळें ती चिडून गेली आणि तिनें स्वतः होऊन सिल्व्हांडरला आव्हान करण्याचें ठरविलें. ती मोठमोठ्यानें हंसूं लागली. तिचें तें अस्वाभाविक हंसणें पाहून सिल्व्हांडरहि चपापला. हळूहळू तिचें हास्य वाढतच गेलें आणि तिच्या वासनेचें रूपांतर भयंकर आसक्तींत झालें. —आणि नंतर व्हावयाचें तेंच झालें. एक पुरुष आणि एक स्त्री एकांतवासांत असल्यावर जें काय घडतें आणि तें घडावें अशी जी सैतान किंवा देव यांची इच्छा असते तें तेथेंहि घडलें आणि तें










निद्रावस्थेंत कीं जागृतावस्थेंत घडलें, स्वेच्छेनें कीं बळजबरीनें, शुद्धींत कीं गुंगींत हें कुणाहि डॉक्टरला सिद्ध करतां आलें नसतें.

सोफियाचीं वसनें सैल झालीं आणि तिनें लपवून आणलेला खंजीर संगमरवरी फरशीवर पडून त्याचा खण्ण ऽऽ असा मोठा आवाज झाला. त्याबरोबर लगतच्या खोलींत राहून ह्या सर्व घडामोडींवर नजर ठेवणाऱ्या हेलेनचा आनंद गगनांत मावेनासा झाला. एखाद्या विजयी वीराप्रमाणें तिनें आपल्या दासींसह त्या दिवाणखान्यांत प्रवेश केला. आणि घरांतील बत्ती वर करून जेव्हां तिनें बिछान्याकडे दृष्टिक्षेप केला, तेव्हां सोफिया लाजेनें चूर झाली आणि तिनें आपली मान दुसरीकडे वळविली. तें दृश्य पाहून हेलेनच्या दासींनाहि एक प्रकारचा उन्माद चढला आणि त्यांनीं त्या देशांतील पूर्वीच्या मूर्तिपूजक धर्माच्या चालीस अनुसरून त्या तरुण जोडप्यावर फुलें उधळलीं. सोफियाला आपल्या दुर्दैवाची जाणीव झाली. पण त्याला फार उशीर झाला होता.

हेलेननें गहिंवरून आपल्या बहिणीला बाहुपाशांत कवटाळिलें. पार्श्वसंगीताचे स्वर अधिकच मोठे झाले. हेलेनच्या दासी हर्षोन्मादानें विवस्त्र स्थितींत कामदेवाचीं गाणीं गात नाचूं लागल्या. जणूं कांहीं खिश्चन जगतांत प्रवेश करणाऱ्या पॅरिसचें तें स्वागत होतें! त्यानंतर चंदनी लाकडाचें आगटें पेटविण्यांत आलें व त्यांत सोफियाच्या जोगिणीच्या कपड्यांचें दहन करण्यांत आलें.

इतकें होईतोंपर्यंत सूर्योदय झाला. हेलेनच्या नोकरांनीं वाड्याचीं दारें उघडण्यापूर्वींच शहरांतील निशाचरांनीं व उपटसुंभांनीं तिच्या दारांत गर्दी केली. कारण तिनें शीलसंपन्न सोफियावर मिळविलेल्या विजयाची वार्ता सूर्योदयापूर्वींच शहरभर झाली होती. त्यानंतर सोफियाच्या त्यागी आणि शीलसंपन्न जीवनाचा पुरता अधःपात झाला. ज्या सफाईनें तिनें आपले कपडे बदलले, तितक्याच सफाईनें तिनें आपलें जीवनहि बदललें. त्या दोघी बहिणींचा वेश्याव्यवसाय इतका फोफावला कीं, त्यांच्या उत्पन्नाची बरोबरी करणारा एकहि धनिक किंवा सरकारी अधिकारी सबंध ॲक्विटानियामध्ये सांपडेनासा झाला. कांहीं वर्षें निघून गेलीं. पुरुषांना आतां त्या दोघींचा वीट येऊं लागला. ती काळाची करणी होती. एके काळीं ज्या हंसऱ्या डोळ्यांनीं ॲक्विटानियांतील साऱ्या तरुणांना पागल केलें होतें, त्यांच्याभोंवतीं आतां काळीं वर्तुळें दृग्गोचर झालीं. आणि त्या नितळ व मधुर त्वचेवर सुरकुत्या पडल्या. त्या जरेच्या खुणा लपविण्यासाठीं त्या दोघी बहिणी कृत्रिम साधनांचा उपयोग करूं लागल्या. परंतु त्यांची ही करामत धूर्त पुरुषांच्या ध्यानीं आल्याशिवाय राहिली नाहीं. हळूहळू त्या वाड्यांतील पूर्वीचा जल्लोष कमी होत गेला, पार्श्वसंगीताचे सूर मंदावत गेले व दिवे लवकर मालवले जाऊं लागले. आणि एके दिवशीं तेथें कायमचीच स्तब्धता पसरली!

एका प्रातःकाळीं त्या दोघी बहिणी बुरख्यांमध्यें चेहरे लपवून दोन छायांप्रमाणें त्या भव्य प्रासादांतून द्वारपालाची नजर चुकवून बाहेर पडल्या आणि नंतर त्या तेथें पुन्हां कुणालाच दिसल्या नाहींत. त्यांच्याविषयीं अशी आख्यायिका आहे कीं, (परंतु त्याबद्दल कुणीच खरें सांगूं शकत नाहीं) त्यांना उत्तरआयुष्यांत आपल्या पापी जीवनाचा पश्चात्ताप वाटूं लागला व त्याचें प्रायश्चित्त घेण्याकरितां त्या परदेशांतील एका जोगिणीच्या मठांत जाऊन राहिल्या. आपली अगणित संपत्ति त्यांनीं धर्मादाय संस्थेला अर्पण केली. असें सांगतात कीं, त्याच पैशांतून तीं दोन मिनारांची इमारत उभारण्यांत आली. त्या इमारतीसारखी शोभिवंत आणि भव्य इमारत सबंध ॲक्विटानियामध्यें नव्हती. त्या इमारतीच्या उभारणीसाठीं सतत कैक वर्षेंपर्यंत हजारों मजूर खपत होते. ज्या वेळीं ही इमारत बांधून पूर्ण झाली तेव्हां तिचें नयनमनोहर सौंदर्य पाहून लोकांचे डोळे दिपून गेले. कारण देशांतील पद्धतीप्रमाणें त्या इमारतीवर एकच मिनार उभारण्याऐवजीं स्त्रियांच्या सुकुमार देहासारखे दोन मिनार उभारण्यांत आले होते. ते मिनार उंची, आकार आणि कलाकुसर ह्यांमध्यें इतके समान दिसूं लागले कीं, त्यासाठीं लोक त्यांना ‘जुळे मिनार’ असें संबोधूं लागले. कदाचित् जुळ्या बहिणींची स्मृति म्हणूनहि त्या इमारतीला ‘जुळ्यांचें घर’ हें नांव ठेवण्यात आलें असेल!








# लयतत्त्वाचें पद्यरचनेंतील स्थान

## १. लय आणि ऱ्हिद्म्

श्री. गोविंद विष्णु खासगीवाले

बडोद्याचे प्रा. ना. ग. जोशी हे छंदःशास्त्राचे मोठे व्यासंगी आहेत. मराठी, हिंदी, गुजराती वगैरे भारतीय भाषांच्या छंदःशास्त्राप्रमाणें त्यांना पाश्चात्त्य भाषांच्या छंदःशास्त्रांचाहि परिचय आहे. त्यामुळें त्यांना मराठी छंदःशास्त्राचा तौलनिक पद्धतीनें विचार करतां येतो. आतांपर्यंत निरनिराळ्या मासिकांतून त्यांचे छंदोविषयक बरेच लेख प्रसिद्ध झाले आहेत. जून १९५१ च्या 'नवभारतां'त त्यांचा 'लयतत्त्वाचें पद्यरचनेंतील स्थान' हा लेख प्रसिद्ध झाला आहे. त्यांत त्यांनीं माझ्या 'मराठी छंदःशास्त्र' या निबंधांतील विधानांवर कांहीं आक्षेप घेतले आहेत. त्याविषयीं माझें म्हणणें मी पुढें मांडीत आहे.

'छंदोरचना' ग्रंथांतील कै. डॉ. पटवर्धन यांचीं 'पद्य म्हणजे लयबद्ध अक्षररचना' वगैरे सारीं विधानें कशीं अशास्त्रीय, अव्यवहार्य आणि तत्त्व-विघातक आहेत त्याचें सोदाहरण विवेचन 'मराठी छंदःशास्त्र' या निबंधांत मीं केलें असून मराठी छंदःशास्त्राची पुनर्घटना कशी व्हावयास पाहिजे याचेंहि दिग्दर्शन त्यांत केलें आहे.

शार्दूलविक्रीडितादि अक्षरगण वृत्तांचा 'अना-वर्तनी' म्हणून निर्देश करण्यांत पटवर्धनांची चूक झाली आहे, असें प्रा. जोशी यांना वाटतें. लगत्व-भेदातीत पद्यप्रकाराला छंद म्हणून निराळें स्थान देण्यांत पटवर्धनांची तर्कदुष्टता आहे असें त्यांनीं प्रतिपादन केलें आहे ('सह्याद्रि', डिसेंबर १९४०). आणि वरील लेखांत पटवर्धनांची पद्याची व्याख्या अतिव्याप्ति-दोषानें युक्त आहे व लयबद्धतेच्या सिद्धांतांचें त्यांनीं स्पष्टीकरण केलेलें नाहीं, असें प्रा. जोशी यांनीं म्हटलेलें आहे. म्हणजे 'छंदोरचने'-तील विधानें सदोष असल्याचें त्यांनाहि मान्य आहे. तथापि ते छंदोरचनेचे निस्सीम अनुयायी आहेत. आणि छंदोरचनेंतील विवेचनपद्धतीच्या साऱ्या लकबी त्यांनीं आत्मसात् केल्या आहेत, हें त्यांच्या लिखाणावरुन दिसून येईल.

माझ्या निबंधांतील छंदत्वाच्या व्याख्येवर वगैरे प्रा. जोशी यांनीं आक्षेप घेतले असून बरेंच धर-सोडीचें विवेचन केलें आहे. एकंदरींत लयबद्धता हा पद्याचा गुण मानणें, आणि 'ऱ्हिद्म्' या अर्थी 'लय' शब्द योजणें हें योग्य कीं अयोग्य हाच प्रस्तुत वादाचा मुख्य विषय आहे.

प्रा. जोशी यांनीं 'नवभारतां'तील (जून १९५१) लेखांत आरंभींच "वास्तविक पद्यरचना आणि लयबद्धता किंवा लयतत्त्व यांच्या परस्पर-

---

"लयतत्त्वाचें पद्यरचनेंतील स्थान" हा श्री. ना. ग. जोशी यांचा लेख 'नवभारता'च्या जून १९५१ च्या अंकांत आलेला आहे. त्यासंबंधीं श्री. गो. वि. खासगीवाले यांनीं आपले विचार प्रस्तुत लेखरूपानें आमच्याकडे आल्याला बरेच दिवस झाले. पण योग्य स्थलावकाशाच्या अभावीं त्यांचा लेख आतांपर्यंत छापूं शकलों नाहीं. प्रस्तुत स्थळीं त्यांचा हा लेख व 'नवभारतां'तील या विषयावर लिहिणारे मूळ लेखक श्री. ना. ग. जोशी यांचें त्यासंबंधीं स्पष्टीकरण अशीं दोन्हींहि देत आहोंत —का. सं.








संबंधाबद्दल फारसें रण माजण्याचें कारण नाहीं. कलात्मक सृजनक्रियेंत एक प्रकारची लयबद्धता मूलभूत असते असें आपण गृहीत धरूनच चालतों " अशी प्रस्तावना केली आहे. पुढें " लय शब्द 'हिदम्' या अर्थी वापरला जातो. हिदम्‌चा विशिष्ट व पारिभाषिक म्हणून जो अर्थ वेब्स्टरच्या कोशांत आहे त्या अर्थानें मराठींत लयबद्धता किंवा ताल-बद्धता ही संज्ञा रूढ झाली आहे. तेव्हां ही रूढि म्हणजेच संकेत होय; आणि त्यायोगें लयबद्धता हा हिदम् या अर्थी योग्य प्रतिशब्द आहे " असा पोकळ कोटिक्रम प्रा. जोशी करतात. जी गोष्ट सिद्ध करावयाची ती सिद्ध आहे असें गृहीत धरूनच प्रतिपादन करण्याची त्यांची ही सांप्रदायिक पद्धति आहे. मराठींत लयबद्धता ही संज्ञा रूढ केली कोणीं ? आणि मराठी भाषेंत लयबद्धता ही संज्ञा रूढ झालेली होती तर त्याबद्दल वादाचें रण माजण्याचें कारण काय होतें ? पूर्वाचार्यांना हिदम्‌ची कल्पनाहि नव्हती. पण पद्यांत लयबद्धता असते असेंहि आजवर कोणीं कोठें म्हटलेलें नाहीं. डॉ. पटवर्धनांनीं ही नवी कल्पना पुढें मांडली म्हणूनच हा वाद उपस्थित झाला, ही गोष्ट श्री. जोशी विसरतात असें दिसतें. शिवाय पटवर्धनांनाहि लयबद्धता म्हणजेच हिदम् असें ठामपणानें सांगतां आलें नाहीं. छंदोरचनेच्या मराठी विवेचनांत लय-बद्धता हा शब्द वापरून त्यांनीं इंग्रजी प्रस्तावनेंत पांच-सहा वगैरे मात्रांचे किंवा अक्षरांचे हिदम् पद्यांत असतात असें आडपडद्यानें म्हटलें आहे. त्यावरून लयबद्धता हा हिदम् या अर्थी योग्य प्रतिशब्द आहे, हें म्हणणेंहि योग्य ठरत नाहीं. पटवर्धनांची अर्धवट समजूत पुढें चालविण्याचा श्री. जोशी यांचा संकेत दिसतो आणि यालाच रूढि म्हणावयाची असेल तर गोष्ट निराळी !

नंतर " शिवाय संस्कृतमध्यें लय शब्दाचा व्यापक उपयोग केलेला आढळतो " असें म्हणून, " रामायणांतील ' तंत्रीलयसमन्वित ' या वचनांतील लय शब्दाचा अर्थ निश्चित व अपरिवर्तनीय लय असा करणें अशक्य आहे. तसा अर्थ घेतल्यास तो अनुष्टुभाला लावणें अशक्य होतें. आणि भरत-नाट्य-शास्त्रांत लय ही शास्त्रीय संज्ञा अशीच अधिक व्यापक अर्थानें वापरली आहे. तेथें लय म्हणजे अक्षरांच्या मात्रा ( कला ) आणि काल म्हणजे टाळी यांचा समन्वय एवढाच अर्थ अभिप्रेत आहे " असें श्री. जोशी यांनीं म्हटलें आहे. पण ही त्यांची गैरसमजूत आहे.

भरत-नाट्य-शास्त्रांत ' कलापातलयान्वितः ' अशी ताल-शब्दाची व्याख्या केली असून, ' निमेषाः पंच मात्रा स्यान्मात्रायोगात् कला स्मृता । निमेषाः पंच विज्ञेया गीतकाले कलान्तरम् ॥ ततः कला-कालकृतो लय इत्यभिसंज्ञितः । ' असें म्हटलें आहे. म्हणजे 'पांच निमेषांची एक मात्रा; मात्रायोगानें कला होते. आणि गायनांत प्रत्येक कलेमध्यें पांच निमेषांचें अंतर असावें. म्हणून कला आणि काल यांनीं केलेला तो लय म्हणतात' असा वरील वचनाचा अर्थ आहे. त्यावरून, तालांतील प्रत्येक मात्रा सारख्या प्रमाणाची असण्याची क्रिया, हाच लय शब्दाचा निश्चित अर्थ ठरतो. ( भरतकालीं ताल कलात्मक होता. सध्यां तो मात्रात्मक आहे. ) श्री. जोशी यांनीं काल म्हणजे टाळी असा भलताच अर्थ मानून त्या वचनाचा आपल्या म्हणण्याला आधार घेण्याचा निष्फळ प्रयत्न केला आहे. ' छंदोरचनें 'त " वृत्त हें काव्याचें शरीर आहे " या विधानाला भरत-नाट्य-शास्त्रांतील " इतिवृत्तं तु काव्यस्य शरीरं परिकीर्तितम् " या वचनाचा आधार दिला आहे त्यांतलाच हा प्रकार आहे.

' तंत्रीलयसमन्वित ' या रामायणाच्या वचनांतील लय शब्दाच्या अर्थाचीहि जोशींनीं अशीच ओढा-ताण केली आहे. रामायणांत– " अपूर्वा पाठ्य-जातिं च गेयेन समलंकृताम् । प्रमाणैः बहुभिर्बद्धां तंत्रीलयसमन्विताम् ॥ " असे चरण आहेत. आणि अमरकोशांत ' लयः साम्यम् । ' असा अर्थ दिला असून टीकेंत " गीतवाद्यपादादिन्यासानां क्रिया-कालयोः साम्यम् । " असें म्हटलें आहे. म्हणून तें गायन तंत्रीच्या लयीनें युक्त होतें म्हणजेच तंतुवाद्य आणि गायन यांच्या क्रिया व काल यांचें साम्य होतें, तंतुवाद्य गायनाच्या स्वरतालाबरहुकूम वाजत होतें, बेलय नव्हतें, असाच त्याचा अर्थ होतो. त्यावरून लय शब्दाचा कांहीं तरी व्यापक अर्थ मानणें योग्य होणार नाहीं. तेथें लय शब्दाचा

संगीतशास्त्रीय अर्थच निष्पन्न होतो. कारण लव-कुशांनीं केलेलें काव्यगायन सताल होतें. लय हा दृढ पारिभाषिक अर्थ घेतल्यास तो अनुष्टुभाला लावणें अशक्य होतें, असें जोशी म्हणतात; परंतु अशक्य होतें म्हणजे काय होतें याचा त्यांनीं कांहींच खुलासा केलेला नाहीं. एकंदरींत पद्य व गायन यांचा संबंध जिव्हाळ्याचा असल्यानें पद्या-विषयीं बोलतांना लय शब्द वापरल्यास त्याचा संगीत-शास्त्रीय अर्थ घेणेंच अवश्य आहे. लय शब्दाचा कांहीं तरी काल्पनिक व्यापक अर्थ मानणें चुकीचें आहे.

मराठी भाषेंतील सर्व पद्यप्रकार तालबद्ध होऊं शकत नाहींत. “ अतालंच सतालं च द्विप्रकारं च तद् भवेत् । ” असें भरतानें स्पष्ट सांगितलें आहे. म्हणून मराठी पद्याचे छांदस ( माझ्या निबंधांतील व्याख्येप्रमाणें ) व सताल असे मुख्य दोन भेद मानावे लागतात. आणि ‘ अंगभूता हि तालस्य यतिपाणिलयाः स्मृताः ’ या भरत-नाट्य-शास्त्रां-तील वचनाप्रमाणें लयहि तालाच्या अंगभूत असते म्हणजे पद्य तालबद्ध असल्याखेरीज त्यांत लयबद्धता संभवत नाहीं. म्हणून पद्य म्हणजे लयबद्ध रचना म्हणणें सर्वस्वीं अशास्त्रीय व अव्यवहार्य ठरतें.

‘ सत्यकथे ’च्या मे १९५१ च्या अंकांत प्रा. जोशी यांचा ‘ लयबद्धता आणि छंदोरचना ’ हा लेख प्रसिद्ध झाला आहे. त्यांत त्यांनीं “ ह्रिदम्‌च्या बाबतींत अनेक तऱ्हेचीं मत मतान्तरें आहेत ” असा हवाला देऊन, “ या तत्त्वाची व्याख्या करणें मात्र फार जड जाते ” असें म्हटलें आहे. त्यावरून ह्रिदम्‌चा अर्थ म्हणजे एक न उलगडणारें कोडें, गौडबंगाल आहे, अशी खात्री होते.

ह्रिदम्‌च्या अर्थाविषयीं असा घोंटाळा आहे. तथापि, प्रस्तुतच्या वादविषयक लेखांत “ सर्व सृजनात्मक कलासृष्टीला व बाह्य-सृष्टीलाहि स्पर्शिणारें ह्रिदम्‌चें व्यापक स्वरूप संगीत, पद्य, वस्तु वगैरेंत सर्वत्र असतेंच असतें, असें पाश्चात्त्य कलामीमांस-कांनीं एकमतानें मान्य केलें आहे. आपली मराठी भाषा ही इंडोयुरोपीय भाषासमूहांतील असल्यानें ह्रिदम्‌चें तत्त्व मराठी पद्यरचनेंतहि महत्त्वाचें आहे. आणि ह्रिदम् या शब्दाला लयबद्धता हा मराठी प्रतिशब्द योग्य आहे ” असें प्रा. जोशी निन-दिक्कत म्हणतात. परंतु या म्हणण्यांत कांहीं स्वारस्य नाहीं. लय शब्दाचा संगीतांतील अर्थ त्यांना उपयुक्त ठरत नाहीं, याचा खुलासा वर झालाच आहे. आणि लय शब्दाचे चित्तैकाग्र्य, विलास, विश्रांति, नाश वगैरे जे अर्थ कोशांत आहेत ते ह्रिदम् या अर्थीं निरुपयोगी आहेत. तथापि ह्रिदम् शब्दाच्या सर्व संभाव्य अर्थांचे आरोप लय शब्दावर करण्याचा अनर्थ ते करूं इच्छितात. आणि त्या हेतूनें “ लयतत्त्व ही एक अतिव्यापक अमूर्त कल्पनाप्रतिमा आहे ” असा गूढगुंजनात्मक शब्द-प्रयोग श्री. जोशी करतात. परंतु लय शब्दाला हीं विशेषणें झेंपणारीं नाहींत. सर्व चराचर सृष्टीला अंतर्बाह्य व्यापून असणारें अमूर्त तत्त्व म्हणजे एक ब्रह्मच होय. म्हणून ह्रिदम् या अर्थीं ब्रह्म या शब्दाची निवड श्री. जोशी यांनीं केल्यास ठीक होईल. ह्रिदम् या अर्थीं लय शब्द योजणें हें केव्हांहि समंजसपणाचें ठरणार नाहीं.

ह्रिदम् शब्दाच्या अर्थाविषयीं पाश्चात्त्य विद्वानां-चीं अनेक मतमतान्तरें आहेत हें ठाऊक असूनहि श्री. जोशी ह्रिदम् शब्दाला मराठी प्रतिशब्द निश्चित करण्याच्या भानगडींत पडण्याचा अट्टहास करतात हा एक चमत्कारच आहे. ज्या दोन गोष्टींची तुलना करावयाची त्यांत गुणसाधर्म्य असावें लागतें, नुसतें मूलभूत तत्त्व एक असून भागत नाहीं. मराठी पद्यांत आघाताचें तत्त्व नाहीं, लघु-गुरुत्वाला प्राधान्य आहे आणि संस्कृत-मराठी भाषा व पाश्चात्त्य भाषा यांमध्यें फार फरक आहे. म्हणजेच या भाषांची संस्कृति व प्रकृति यांमध्यें महदंतर आहे. म्हणून या भाषांचा तौलनिक पद्धतीनें विचार करणें अयोग्य आहे. हिरा आणि कोळसा या दोन पदार्थांत मूलभूत तत्त्व एकच असलें तरी त्यांचे गुणधर्म भिन्न असल्यानें त्यांची तुलना करणें सयुक्तिक नाहीं. ऱ्हिदम् तत्त्व आंग्ल भाषेमध्यें उपयुक्त ठरणारें असेल. ऱ्हिदम् हें एक इंग्रजी खूळ आहे असें मीं कोठें म्हटलेलें नाहीं व तसें म्हणण्याचा माझा अधिकारहि नाहीं. आपल्या पूर्वाचार्यांना कांहीं कळत नव्हतें असें म्हणण्याचें धाष्ट्र्य आंग्ल-विद्याविभूषित आधुनिक पंडितच करूं शकतात.



अनुक्रमणिका






तथापि न्हिदमूच्या सांच्यांत मराठी पद्यरचना ठोकून बसविणें शहाणपणाचें नव्हे हें निश्चित.

'मराठी छंदःशास्त्र' या माझ्या निबंधांत "स्वराचा विशेष चढउतार न करतां म्हणतांना गति उत्पन्न होऊन मधून थांबतां येणें आणि फिरून उच्चारणाला अडथळा न येतां पुढें गति चालू होऊन चरणाची मर्यादा ठरणें ही पद्याची अंतर्गत क्रिया म्हणजेच छंदत्व असें निश्चित म्हणतां येतें" असें छंदत्वाचें लक्षण मीं दिलें असून, पुढें "थोडक्यांत सांगावयाचें झाल्यास पद्याची नैसर्गिक उच्चारणक्षमता म्हणजेच छंदत्व होय" असें म्हटलें आहे. "वरील लक्षणाचा न्हिदमूच्या साहाय्यानें केलेल्या व्याख्येला विरोध नाहीं. उलट अनावर्तनी वृत्तें किंवा ग्रांथिक ओवी यांसारख्या पद्यांत गति असते असें सांगून श्री. खासगीवाले यांनीं फारच मोठी कामगिरी बजावली आहे. परंतु नैसर्गिक उच्चारणक्षमता या शब्दांत वरील लक्षणाचा कमकुवतपणा दडून बसला आहे" असें श्री. जोशी यांचें म्हणणें आहे. वरील लक्षण न्हिदमूच्या अर्थाकडे लक्ष देऊन मीं केलेलें नाहीं. तें लक्षण केवळ पूर्वाचार्यांच्या वचनाचा अनुवाद आहे. त्यांत माझी कांहीं कल्पना नाहीं. मीं संशोधन केलें आहे इतकेंच. म्हणून फारच मोठी कामगिरी बजावल्याचें श्रेय माझें नसून तें पूर्वाचार्यांचेंच आहे. आणि उच्चारण–सामंजस्य–सौकर्य–असे पूर्वाचार्यांनीं जे शब्द योजले आहेत त्याअर्थीं उच्चारणक्षमता हा शब्द मीं वापरला आहे. नैसर्गिक उच्चारणक्षमता हे शब्द श्री. जोशी यांना बोचक कां वाटतात हें समजत नाहीं. हे शब्द मीं संदिग्ध वापरले आहेत असाहि श्री. जोशी यांचा आरोप आहे. परंतु हे शब्द म्हणजे वरील लक्षणाचें तात्पर्य आहे. त्यावरून, अडथळा न येतां स्वाभाविक गति उत्पन्न होऊन पद्य म्हणतां येणें हा त्याचा अर्थ आहे, हें कोणाच्याहि ध्यानीं येणारें आहे. शिवाय "छंदांत नैसर्गिक उच्चारणक्षमता असते हें खरेंच" असें श्री. जोशी यांनीं पुढें म्हटलेंच आहे. यावरून त्यांनाहि वरील शब्दांचा अर्थ समजला आहे हें दिसून येतें. "थोडक्यांत सांगावयाचें झाल्यास......" हें वाक्य ते वरील लक्षणाचा उत्तरार्ध मानतात ही त्यांची गैरसमजूत आहे. पद्याची रचना ही मुळीं नैसर्गिक नसते असेंहि ते म्हणतात. परंतु 'नैसर्गिक' हें विशेषण उच्चारणक्षमता या शब्दाचें आहे, पद्यरचनेचें नाहीं, हें त्यांच्या ध्यानीं आलें नाहींसें वाटतें. आणि 'गद्यांत काय अनैसर्गिक उच्चारक्षमता असते असें म्हणावयाचें?' असा ते प्रश्न करतात. परंतु गद्य आणि पद्य यांच्या उच्चारणांत मूलतःच फरक आहे याविषयीं कोणाचेंहि दुमत असणें संभवनीय वाटत नाहीं. छंदाचें स्वाभाविक उच्चारण म्हणजे छंदत्वाच्या लक्षणांत सांगितल्याप्रमाणें स्वराचा विशेष चढउतार न करतां उच्चारण करणें, हें श्री. जोशी यांच्या ध्यानीं आलें नाहीं असें नाहीं. परंतु मुद्दाम आडरानांत शिरून वरील छंदत्वाच्या लक्षणांत कांहीं न्यून राहिलें आहे, असें भासवावयाचें एवढाच त्याचा हेतु दिसतो.

पद्याची नैसर्गिक उच्चारणक्षमता कशी असते याचें विवेचन शिखरिणी व आर्या या छंदांचीं उदाहरणें देऊन मीं निबंधांत केलें आहे. आणि छंदांतील एका गणाऐवजीं तितक्याच अक्षर-मात्रांचा दुसरा गण घातला किंवा गणांचा अनुक्रम बदलला तर त्या छंदाचें ठराविक पद्धतीप्रमाणें सरळ उच्चारण करतां येत नाहीं, अडथळा उत्पन्न होतो, असें म्हटलें आहे. म्हणजेच छंदांत अक्षरें किंवा मात्रा यांची नुसती संख्या भरून चालत नाहीं. छंदांत अक्षरांचा विशिष्ट लघु-गुरु-क्रमच असावा लागतो. तरच त्या छंदाचें नैसर्गिक उच्चारण होऊं शकतें, हें मीं स्पष्टपणें दाखविलें आहे. तथापि ही नैसर्गिक उच्चारणक्षमता तरी छंदांत कां येते, याचें मौलिक कारण मीं सिद्ध केलें नाहीं असा श्री. जोशी यांचा आक्षेप आहे. त्यांनीं—

जधी वेधी[१] । बाणें[२] । मनसिज मनीं[३] । प्रेमवतिला[४] ।

असे शिखरिणी वृत्ताचे चार तुकडे मानले आहेत, आणि '३ व ४ हे तुकडे सममात्रक आहेत, १ ला जवळजवळ तेवढाच आहे. सप्तमात्रकावरून अष्टमात्रक बनण्याकडे म्हणण्याची गति आहे. व मधला २ हा तुकडा यतीनंतरचा आहे. व तेथें नैसर्गिक विरामच असतो. त्यामुळें गतींत पडणारा खंड भरून निघतो', असें म्हणून पुढें वरील तुकड्यां-



अनुक्रमणिका







ची अदलाबदल करून दाखविली आहे. आणि ' मधल्या यतीच्या तुकड्याचें ( तुकडा नं. २ ) स्वरूप कायम राहणेंच योग्य. कारण त्याची जागा परंपरेनें कायम झाली आहे. परंतु त्याचीहि अदलाबदल करतां येईल. पण मग तेथें प्लुत मात्रा द्याव्यास लागतील व तेंच अस्वाभाविक वाटूं लागेल. पण तें जर चालू रूढ सोडणींत अस्वाभाविक भासत नसेल तर त्यांतहि ते संकेत रूढ झाल्यावर तसें वाटणार नाहीं. तेव्हां आहे तीच रचना किंवा आहे तोच लगक्रम अपरिवर्तनीय व उच्चारणक्षम आणि म्हणूनच तो नैसर्गिक असें नसून, ओळींतील अंतर्गत मात्रिकसमूह व त्यांची जास्तींत जास्त आवर्तनक्षम मांडणी यांवरच अनावर्तनी वृत्तांतील गति अवलंबून असते. म्हणून शिखरिणीचें उदाहरण अपरिवर्तनीय खासच नाहीं ', अशी श्री. जोशी यांची विचित्र विचारसरणी आहे. यावरून अनावर्तनी वृत्तांची रचना मात्रिकसमूहाच्या जास्तींत जास्त आवर्तनक्षमतेवर झाली आहे, अशी त्यांची भ्रामक समजूत झालेली दिसते. आणि शिखरिणीच्या उच्चारणाविषयींहि त्यांची कांहीं विपरीत कल्पना झाली असावीसें वाटतें. नाहीं तर सहा मात्रा जवळजवळ सात मात्रांइतक्या आहेत, सात मात्रांची गति आठ मात्रांकडे असते, विरामानंतर गतींतील खंड भरून निघतो आणि वरील शिखरिणीच्या तुकड्यांची अदलाबदल केली तरी त्या चरणाचे शिखरिणीच्या रूढ चालीप्रमाणें उच्चारण होऊं शकेल, अशीं शास्त्रीय विवेचनांत न शोभणारीं व अव्यवहार्य विधानें श्री. जोशी यांनीं बेछूटपणें केलींच नसतीं. त्यांनीं दाखविल्याप्रमाणें शिखरिणीच्या तुकड्यांची अदलाबदल करून होणाऱ्या चरणाचें शिखरिणीच्या स्वाभाविक चालीप्रमाणें उच्चारण करतां येतें, असा प्रत्यक्ष प्रयोग श्री. जोशी यांनीं करून दाखविला तर त्यावरून छंदःशास्त्राचें वैयर्थ्यच सिद्ध केल्यासारखें होईल. मग पद्यरचनेविषयीं नियम करण्याचें कांहीं कारणच उरणार नाहीं. प्रस्तारविधीनें एकेका छंदापासून कोटी कोटी प्रकार होऊं शकतील असें पूर्वाचार्यांनीं सांगितलें आहे. परंतु प्रत्यक्षांत त्यांचे अवघे चार-दोन प्रकारच दिसून येतात. याचें कारण केवळ गणितानें उत्पन्न होणारे प्रकार उच्चारणक्षम होऊं शकत नाहींत हेंच होय. म्हणून नैसर्गिक उच्चारणक्षमता हेंच छंदत्वाचें मौलिक तत्त्व ठरतें. जास्तींत जास्त आवर्तनक्षम मात्रिकसमूह हें छंदत्वाचें तत्त्व खास नव्हे.

" शिखरिणीच्या गणांची अदलाबदल करून वाचूं लागलों तर उच्चारण नैसर्गिक राहणार नाहीं, त्यांत अडथळा येईल ही गोष्ट खरी आहे. पण आज जी नैसर्गिकता वाटते ती तरी सुरुवातीला तशी वाटली असण्याचा संभव काय ? " असा श्री. जोशी यांचा एक मार्मिक सवाल आहे. त्यावरून त्यांनीं नैसर्गिक उच्चारणक्षमतेला मान्यता दिली आहे, याबद्दल त्यांचे आभार मानतों. शिखरिणी वगैरे अनावर्तनी छंदांचें उच्चारण परंपरेनें प्राचीन कालापासून जें चालत आलेलें आहे, त्यांत मध्यंतरीं केव्हां बदल झाला असल्याचें कोणीं शास्त्रकारांनीं सांगितलेलें नाहीं. म्हणून आज जें उच्चारणाचें नैसर्गिक स्वरूप आहे तें सुरुवातीपासूनचेंच आहे असें निःशंकपणें म्हणतां येतें. निरर्थक कल्पना लढविण्यांत कांहीं हशील नाहीं. कारण मानवांनीं आपले संकेत बदलले तरी निसर्ग आपले नियम केव्हांहि बदलत नाहीं !

मीं माझ्या निबंधांत पूर्वाचार्यांच्या मताप्रमाणें छांदस आणि सताल असे पद्याचे मुख्य दोन भेद मानले असून, छांदस रचना म्हणजे ज्या पद्याचें उच्चारण छंदत्वाच्या लक्षणांत सांगितल्याप्रमाणें करता येतें ती व सताल रचना म्हणजे ज्या रचनेंत स्वराचा विशेष चढउतार न करतां म्हणण्याचें, अक्षरसंख्येचें वगैरे बंधन नसतें ती. तथापि ज्यांत छंदत्वाचे इतर नियम आणि तालशास्त्राचे नियम पाळलेले असतात ती रचना, असा खुलासा केलेला आहे. छांदस रचनेचा तालाशीं कांहीं संबंध नसतो. परंतु सताल रचनेंत जें पद्य ज्या तालांतील असेल त्या तालाच्या मात्रा-गणांप्रमाणें त्या पद्यांतील अक्षरांचे मात्रागण असावे लागतात, असा नवा सिद्धांत मीं मांडला आहे. म्हणून पद्य आणि ताल यांचा संबंध कसा असतो तें सांगून तालाविषयीं अवश्य ती माहिती निबंधांत दिली आहे. त्यामुळें हें पद्यरचना-शास्त्र आहे कीं संगीत-ताल-शास्त्र








आहे, असा संदेह श्री. जोशी यांना उत्पन्न झाला आहे. मीं पांच मात्रांचा गण मानलेला नाहीं. तथापि मीं पांच मात्रांचा गण मानला आहे असें श्री. जोशी म्हणतात. त्यावरून मीं केलेलें पद्य आणि ताल यांच्या संबंधांविषयींचें विवेचन त्यांनीं नीट पाहिलें नाहीं असें दिसतें. आणि म्हणून मीं मानलेल्या गणामुळें एका जातीच्या पोटीं अनेक गणवृत्तें निर्माण होऊन अनवस्थाप्रसंग उद्‌भवेल अशी त्यांना भीति वाटते. परंतु श्री. जोशी यांना वाटत असलेली भीति अगदीं निराधार आहे, एवढें निश्चित सांगतों. भृंग, पद्म वगैरे आवर्तनात्मक गण मानून कसें भागत नाहीं याचें विवेचन मीं निबंधांत स्पष्टपणें केलेंच आहे. त्याची पुनरुक्ति येथें करीत नाहीं.

"कालभाराच्या अनुषंगानें अक्षरांची विशिष्ट योजना केल्यानें जी एक प्रकारची गति पद्यांत उत्पन्न होते ती गतीच पद्याचें प्राणभूत तत्त्व होय" अशी श्री. जोशी यांनीं पद्याची पुनरुचित म्हणून व्याख्या दिली आहे. या व्याख्येंत पूर्वाचार्यांचा गति हा शब्द आणि हिदम् शब्दाच्या अर्थाचा अंश 'कालभार' या दोन शब्दांची गुंफण 'अनुषंग' आणि 'विशिष्ट' या संदिग्ध शब्दांनीं करण्याचा त्यांचा प्रयत्न आहे. परंतु वरील व्याख्येवरून कोणाला कांहीं निश्चित बोध होईल असें वाटत नाहीं, आणि वरील व्याख्या "कांहींशी अशी होऊं शकेल" असें श्री. जोशी यांनींच म्हटलें आहे. त्यावरून त्यांना स्वतःलाहि या व्याख्येच्या निश्चितपणाबद्दल खात्री वाटत नाहीं हें उघड दिसतें.

गेल्या वीस-पंचवीस वर्षांपासून मराठी छंदःशास्त्राविषयीं नव्याजुन्या मतवाल्यांचा वाद चालू आहे. आतांपर्यंत यासंबंधीं उभयपक्षीं अनेक लेख लिहिले गेले आहेत. तथापि हा वाद मिटलेला नाहीं. कारण छंदःशास्त्राचें मुख्य तत्त्व उच्चारण हें आहे. त्याचा उलगडा शब्दांनीं कितीहि केला तरी होण्यासारखा नाहीं. एकानें उच्चारण असें होतें म्हणावयाचें व दुसऱ्यानें तसें होत नाहीं असें प्रतिपादन करावयाचें इतकेंच. म्हणून एखाद्या साहित्य-संगीतज्ञ-मंडळापुढें उभयपक्षीं प्रात्यक्षिकानें चर्चा होईल तर ती उद्‌बोधक ठरून या वादाचा निर्णय होण्याला सुलभ साधन होईल. म्हणून. श्री. जोशी यांनीं किंवा मराठी छंदःशास्त्राविषयीं आस्था असणाऱ्या अन्य कोणी रसिकांनीं पुण्यासारख्या विद्यानगरींत तशी चर्चा होण्याचा योग जमवून आणल्यास मराठी भाषेच्या उत्कर्षाच्या दृष्टीनें तें एक मोठेंच कार्य केल्यासारखें होईल.

शेवटीं श्री. जोशी यांनीं या विषयाला चालना देऊन पुनश्च मला दोन शब्द लिहिण्याची संधि दिली याबद्दल मी त्यांचे मनःपूर्वक आभार मानतों.

---

## २. लयतत्त्वाविषयीं आणखी थोडें स्पष्टीकरण

श्री. ना. ग. जोशी

लयबद्धता किंवा लयतत्त्व आणि Rhythm यांचें पद्यरचनेंतील स्थान, याविषयींचे माझे स्पष्ट विचार 'नवभारतां'त (जून १९५१) आणि 'सत्यकथा, 'अभिरुचि', 'म. सा. पत्रिका' वगैरे नियतकालिकांतील इतर लेखांत सविस्तर मांडलेच आहेत. या विषयासंबंधीं श्री. खासगीवाले यांची भूमिका प्रतिकूल आहे हेंहि सुप्रसिद्धच आहे. परंतु हा विषय आतां सूक्ष्मतया वाचकांपुढें आलेला आहे व त्याविषयींचीं आपलीं मतें वाचक तुलनात्मक विचारानें ठरवतीलच. ज्या मुद्द्यांविषयीं स्पष्टीकरण केल्यास विषयांतील विवाद्य प्रश्न समजणें सोपें जाईल असें वाटलें तेवढ्यांचेंच स्पष्टीकरण पुढें दिलें आहे.

'सह्याद्री'च्या डिसेंबर १९४० च्या अंकांत








मी फक्त ' छंदा 'च्या म्हणजे अभंगादि छांदस रचनेच्या स्थानाविषयीं एक ' प्रश्न ' उपस्थित केला आहे. परंतु त्यामुळें ' छंदोरचनें 'तील मूळ सिद्धान्ताला कांहींहि बाध येत नाहीं. प्रश्न केवळ औपपत्तिक ( Interpretational ) आहे, सिद्धान्तविषयक नाहीं.

लयबद्धता व तालबद्धता या संज्ञा मराठींत Rhythm या अर्थानें नवीनच रूढ झाल्या आहेत. परंतु त्यामागील तात्त्विक भूमिका ही व्यापक पायावरची व सार्वत्रिक आहे. गतिमय कलांत ऱ्हिदम् असतें याबाबत कलामीमांसकांची एकवाक्यता आहे. व त्यांत युरोपियन, भारतीय, इंग्रजी-मराठी असला भेद असूं शकत नाहीं. हे भेद आतां कालविपर्यासी ( anachronistic ) झाले आहेत. गतिमय कलांतील गतितत्त्वच ऱ्हिदम् होय व तें पद्यांतील असतें. म्हणून ऱ्हिदम् ही व्यापक व समावेशक संज्ञा असून पद्यांतील ऱ्हिदम् त्याचाच एक विशिष्ट प्रकार होय.

भरताच्या नाट्यशास्त्रांतील ' काल ' संज्ञेचा मीं टाळी असा अर्थ केलेला नाहीं. ' पात ' या संज्ञेचा ' टाळीचा आघात ' असा अर्थ कै. प्रो. कृष्णराव मुळे यांनीं ' भारतीय संगीतां ' त केला आहे व तोच मला अभिप्रेत आहे. तेथेंहि ' पात ' हा पुनरावर्तनमय कालिक ( units ) किंवा ' प्रमाणां ' चाच निदर्शक आहे व ' ताला ' चा तो मूलगामी भाग आहे. संगीतांतील ही कालमानाची पुनरावृत्ति आणि बहुतेक पद्यांतील मात्रिक कालमानाची पुनरावृत्ति मूलतः ( Rhythmic ) लयतत्त्वयुक्तच होत.

रामायणांतील ' तन्त्रीलयसमन्वित ' हें विशेषण अनुष्टुभ् छंदाचें आहे हें निश्चित. ' लय ' शब्दाचा अर्थ केवळ ' साम्य ' केला तरी तोहि व्यापक प्रमाणबद्धता ( symmetry ) याचाच पर्याय होईल. अनुष्टुभांत ' ताला 'त्मक लय कशी येते ? अनुष्टुभ् छंद गाण्याची ही ' ताल 'बद्ध रीत कोणती ? अनुष्टुभांत निश्चित मात्रांचीं आवर्तनें नाहींत, म्हणून ' काल ' युक्त आवर्तनेंहि असणें संभवनीय नाहीं. तेव्हां तन्त्री किंवा तंतुवाद्य यांच्या साथीनें स्वरांतील आरोहावरोहयुक्त गायन एवढाच अर्थ तेथें निष्पन्न होतो.

लयतत्त्व हें व्यापक तत्त्व आहे असें म्हटल्यावर त्याची ' व्याख्या ' करणें कसें जड जातें तें तर्कशास्त्रांतील ' व्याख्या ' व ' संज्ञा ' ( Definition and Nomenclature ) यासंबंधींची माहिती असणाऱ्याला सहज कळून येईल. अशा व्यापक गोष्टींची व्याख्या बहुधा केवळ वर्णनपर असूं शकते आणि वर्णना-वर्णनांत औपपत्तिक फरक असूं शकतो. महत्त्वाची गोष्ट ही आहे कीं, हें लयतत्त्व असतें ह्याबद्दल सर्वांची एकवाक्यता असते. ( विज्ञानांतहि सर्वच कल्पनांच्या व्याख्या संपूर्णतया सिद्ध अशा क्वचितच असतात. ) परंतु ' ऱ्हिदम् ' च्या कल्पनेंत ' गतितत्त्व ' मुख्य आहे ही गोष्ट सर्वमान्य आहे.

आणि म्हणूनच त्याला ' ब्रह्म ' वगैरे म्हणून हास्यास्पद ठरविण्याचा प्रयत्न वृथा आहे. ब्रह्म ही कल्पना इंद्रियातीत अनुभवाची आहे, आध्यात्मिक आहे; उलट ' ऱ्हिदम् 'ची कल्पना पूर्णपणें भौतिक व इंद्रियप्रत्ययाची आहे. तें गतीवर आधारलेलें तत्त्व आहे. विश्वांत जी गतिमत्ता आहे त्यांत अनेक सूर्यमालांचें परिभ्रमणहि येतें. हे सर्व विविध गतिमय आविष्कार विश्वाच्या बुडाशीं असलेल्या ( किंवा प्रारंभालाच त्याला मिळालेल्या ) गतीचे आविष्कार होत. ते सर्व ' ऱ्हिदम् '-युक्त असतात हें कोणीहि खगोलशास्त्रज्ञ सांगूं शकेल; यांत गूढगुंजनाचें दर्शन होत असलें तर तें केवळ आपाततः असेल, एवढेंच.

इंग्रजींतहि लघु-गुरुत्व आहे असें आग्रहानें सांगणारे छंदःशास्त्रज्ञ तिकडे आहेत; आणि इंग्रजी भाषेवर फ्रेंच वगैरे भाषांतील पद्य तर उघड उघड कालभारावर म्हणजे syllabic quantity-वर आधारलेलें आहे. ग्रीक-लॅटिनमध्यें तर तें संस्कृतसारखेंच आहे. यासंबंधांतील श्री. खासगीवाले यांची माहिती अपुरी दिसते. शिवाय इंग्रजींतील वादाचा निकाल कसाहि लागला तरी त्यांत ऱ्हिदम् किंवा लयतत्त्व असतेंच हें दोन्ही पक्षांनाहि मान्य आहेच; म्हणून तें तत्त्व व्यापक म्हणावयाचें.

मीं शिखरिणीचे पाडलेले खंड श्री. खासगीवाले यांना स्वाभाविक उच्चारणक्षम वाटत नाहींतसें








दिसतें. पण छंदांतील या नैसर्गिक उच्चारण-क्षमतेचें गमक काय तें त्यांनीं कोठेंहि स्पष्ट केलेलें नाहीं. आजची चाल रूढ आहे म्हणून ती 'स्वाभाविक' वाटते एवढाच त्याचा अर्थ. त्यामागची संभाव्य उपपत्ति मीं ध्वनित केलेली आहे. याबाबतींत एक नवी माहिती नमूद करतों. गुजरातीचे श्रेष्ठ टीकाकार व छंदःशास्त्रज्ञ प्रा. रामनारायण पाठक यांचीं 'आपलें नवें छंदःशास्त्र' या विषयावर बडोदा येथें सयाजीराव विद्यापीठातर्फे नुकतींच तीन व्याख्यानें झालीं. त्यांत त्यांनीं अनावर्तनी छंदांतहि असे 'संधि' कसे असतात तें सोपपत्तिक दाखविलें. जुने गुर्जर कवि दलपतराम यांनीं आपल्या 'दलपत-पिंगल' या ग्रंथांत अशा छंदावर तालबोधक म्हणजेच आघातबोधक चिन्हें दिलीं आहेत तीं योग्य आहेत, असेंच त्यांना वाटतें. या अनावर्तनी वृत्तांतील ही 'संधि'-युक्त रचना म्हणजे संस्कृतांतील एक खास हिदम् आहे व ती अन्यत्र दिसत नाहीं हें विशेष होय असा त्यांचा दावा आहे. आवर्तनी वृत्तें ते 'जाती'ना जवळचीं मानतात व हिदमदृष्ट्या त्यांना जातींच्या वर्गांत टाकतात. 'छंदोरचने'नें याबाबत फारच श्रेष्ठ कामगिरी केली आहे. मात्र अनावर्तनी वृत्तांत प्लुत मात्रा घालून त्यांना अनावर्तनी बनविण्याचें कारण नाहीं, असें प्रा. पाठक म्हणतात. कारण अनावर्तनी वृत्तांची ही संधिमय व लगत्वनिष्ठ 'गति' ही एक स्वयंभू 'हिदम्' आहे व म्हणून 'छंदोरचनें'तील सिद्धान्त अबाधितच राहतो. मराठींतील 'छंदोरचना'-विरोधी लोकांचीं मतें त्यांनीं वाचलीं असून त्या लोकांची नवीन कल्पना ग्रहण करण्याची अशक्ति पाहून त्यांना खेद होतो. मीं त्यांना माझें 'शिखरिणी'चे खंड व त्यांचें अंतर्गत परिवर्तन म्हणून दाखविलें असता तें त्यांना अस्वाभाविक निश्चित वाटलें नाहीं. उलट 'या दृष्टीनें मीं अजून विचार केलेला नाहीं' असें ते म्हणाले.

अनावर्तनी वृत्तांतीलहि अधिकांत अधिक सम्प्रमाण अक्षरगटांची अदलाबदल केल्यानें जर स्वाभाविक उच्चारण संभवत असेल, तर छंदःशास्त्रच व्यर्थ ठरेल, अशी श्री. खासगीवाले यांना भीति वाटते. ती भीति व्यर्थ आहे. समान खंडांचीं संयोजनें करून अनेक वृत्तें नवनवीन साधल्याचें शास्त्रज्ञांना माहीत आहे. 'छंदोरचना' सहज चाळल्यासहि अशीं उदाहरणें अनेक आढळतात. तसेंच शिखरिणीवरून तयार होणारे हे वेगवेगळे नवे प्रकार फार तर मानावे; शिखरिणीचा रूढ प्रकार 'शिखरिणी'-नामक राहील व बाकीचे इतर नांवांनीं ओळखले जातील. त्यांत वैयर्थ्य कसलें? श्री. खासगीवाले यांच्या 'स्वाभाविक-अस्वाभाविक' वर्गीकरणाचें गमक निश्चित नाहीं; तें गमक केवळ श्रवणसौकर्य असेल तर त्याच श्रवणाच्या साक्षीनें शिखरिणीच्या खंडांचें परिवर्तनहि त्यांना अस्वाभाविक वाटावयास नको होतें, असें माझें मत आहे. श्रवणसौकर्य ही बाब निरपवाद नसून प्रथम श्रवणकटु वाटणारी रचना ऐकल्यास पुढें तशी वाटत नाहीं हा अनुभवहि त्यांनीं जमेस घ्यावा.

असो. श्री. खासगीवाले यांच्यासारख्या निश्चित मताच्या व माहितगार छंदःशास्त्रज्ञांनीं या विषयावर चर्चा केल्यामुळेंच हे विचार मीहि अधिक स्पष्टपणें मांडूं शकलों आहे. याबद्दल मी त्यांचे आभार मानतों.

---

साउथ पॅसिफिकमधील प्रसिद्ध अभिनेत्री मेरी मार्टिन ही गांधीजींच्या मताच्या अनेक पुरस्कर्त्यांपैकीं एक आहे. गांधीजींच्या 'आत्मकथे'त तिनें टॉलस्टॉयच्या 'दि किंग्डम ऑफ गॉड इज विदिन यू' या गोष्टीविषयीं वाचलें. तिनें त्याचा एका रेडिओ-भाषणांत उल्लेख केला. त्याबरोबर जनतेकडून त्याचें इतकें स्वागत झालें कीं, त्या गोष्टीच्या प्रकाशकांनीं मेरी मार्टिनच्या प्रास्ताविकासह त्या गोष्टीची नवीन आवृत्ति काढावयाचें ठरविलें आहे. —'इलस्ट्रेटेड वीकली ऑफ इंडिया' (२०-१-५२) वरून.










सुप्रसिद्ध खत-कारखान्याचें दर्शन : प्रा. देवदत्त अ. दाभोलकर

# भारताचें एक आशास्थान : सिंद्री

पाटणा येथील अर्थशास्त्रपरिषद् आटोपल्यानंतर तेथून जवळ असलेल्या आणि आज खत-कारखान्यामुळें सुप्रसिद्ध झालेल्या सिंद्रीला जायचें मीं ठरविलें, त्या वेळीं माझ्या मनांत दोन साधेसेच हेतू होते. त्यांपैकीं एक तर अगदींच घरगुती होता. सिंद्री कारखान्यांत फोरमन म्हणून काम करीत महाराष्ट्रापासून दूर आडबाजूला पडलेल्या नित्यानंदाला, लताबहिनींना व छोट्या पपी-नन्दूंना भेटावें अशी मनाला उत्कण्ठा होती. त्याचबरोबर एखादा कारखाना पाहण्याची जी स्वाभाविक उत्सुकता सामान्य नागरिकाला असते तीहि पण माझ्या ठिकाणीं होती. असा कारखाना पाहून त्या विषयातील अनभिज्ञ माणसाला अर्थातच कांहीं विशेष बोध होण्यासारखा नसतो. प्रचंड यंत्रें, प्रचंड वेगानें फिरणारीं चाकें, वस्तूंची मोठ्या प्रमाणावर नेआण करणारे वाहतूक-पट्टे ( conveyer belts), तांबडे-पिवळे विद्युद्दीप, भट्टयांच्या बाजूच्या खिडक्यांतून परिचारकानें दाखविलेल्या धगधगणाऱ्या अग्निज्वाला, या सर्व गोष्टी पाहून 'आश्चर्यवत् पश्यति कश्चिदेनम्' असा भाव आपल्या मुखावर उमटविणें एवढेंच कार्य माझ्यासारखा एखादा अनभिज्ञ करूं शकतो.

सिंद्रीचा कारखाना पाहून झाल्यानंतर भारतांतील नवनिर्मितीचें एक भव्य प्रात्यक्षिक म्हणून सिंद्रीविषयीं मला अधिकच आकर्षण व कुतूहल वाटूं लागलें. अर्थशास्त्रांत ज्या गोष्टींचें आम्ही कागदी विवेचन करतों, त्यांचा एक प्रत्यक्ष प्रयोग म्हणून सिंद्री-योजना, तिचा प्रचंड व्याप, तिच्या इतिहासांतील आशा-निराशांचीं आंदोलनें हीं मला अभ्यसनीय वाटूं लागलीं. खोलवर अभ्यासाचा प्रयत्न मीं केलेला नाहीं. परंतु सहज उपलब्ध असलेली काहीं माहिती पुढें देत आहे. ती माझ्याप्रमाणें वाचकांनाहि पुष्कळच बोधप्रद वाटेल असा विश्वास वाटतो.

सिंद्रीच्या या खतकारखान्याचें ( fertilizer-factory हा शब्द मोठा भारदस्त वाटतो. पण हळूहळू मातृभाषेचीहि संवय केली पाहिजे–) क्षेत्रच १ मैल लांब व अर्धा मैल रुंदीचें आहे. आशिया खंडांतील या प्रकारचा सर्वांत मोठा कारखाना हा सिंद्रीचाच. कारखान्याच्या आवारांतीलच रेल्वेमार्गाची लांबी १२ मैल आहे. भट्टयांना कोळसा पुरविणारे, कच्चा माल पुरविणारे सतत फिरते राहणारे वाहतुक-पट्टे ७ मैल लांबीचे आहेत. अमोनिअम सल्फेट सांठविण्यासाठीं बांधलेल्या सिमेंटच्या कोठारा-( Silo )-मध्यें एका वेळीं ९०,००० टन सल्फेट सांठविण्याची सोय आहे. बाष्पशीत-नियंत्रणा-(air-conditioning, humidity control)-नें युक्त असलेल्या या कोठाराची लांबी सुमारें एक फर्लांग आहे. तळाशीं रुंदी १५० फूट व मध्यभागीं उंची ९० फूट आहे. छपराचा आकार अर्धलंब वर्तुळाचा आहे. बाहेरून पाहण्यापेक्षाहि आंत शिरल्यानंतरच त्याच्या विस्तीर्णपणाची खरी कल्पना येते. दुसऱ्या एका ठिकाणीं एका वेळीं एक लाख टन जिप्सम ( gypsum ) सांठविण्याची सोय आहे. फॅक्टरीच्या कामासाठीं दररोज १००० टन कोळसा, ६०० टन कोक, १८०० टन जिप्सम, इतर कच्चा माल ४०० टन लागेल व दररोज १००० टन अमोनिअम सल्फेट या कारखान्यातून तयार होऊं शकेल. आज यांपैकीं तीस टक्केच उत्पादन सुरू झालें आहे. परंतु लवकरच पूर्ण उत्पादनास सुरुवात होईल. कारखान्यासाठीं दररोज १ कोटी २० लक्ष गॅलन पाण्याचा पुरवठा करणें आवश्यक राहील. या एवढ्या आंकड्यांवरूनच कार्याच्या प्रचंडपणाची कल्पना येऊं शकेल. या सर्व हजारों टनांचा वापर, व्यवहार, वाहतूक या गोष्टी केवळ यन्त्राच्या साहाय्यानें होतात असें सांगितलें कीं








हें सर्व काम गडबड, गोंधळ, मजुरांची वर्दळ, झाल्याखेरीज किती सुसूत्रपणें होतअसेल याची कल्पना होऊं शकेल. वज्रहस्त टिप्लर ( Tippler ) नांवाचें यंत्र अर्ध्या मिनिटाहूनहि कमी वेळांत, एखादा लहानसा टिनचा डबा उभा-आडवा-तिरका करुन त्यांतील धान्य ओतून द्यावें त्याप्रमाणें, आगगाडीचा कोळसा, जिप्सम यांनीं भरलेला एक एक माल-डबा रिता करुन देतें ! वाहतूकपट्टयांवरुन या हजारों टनांची अव्याहत वाहतूक करण्यांत येते व किती वाहतूक झाली याचें बरोबर मोजमाप यांत्रिक पद्धतीनें ठेवण्यांत येतें. कोठारामध्यें माल सांठविणें, माल भरुन घेणें, ठराविक वजनाचीं पोतीं भरणें, पोतीं शिवणें हीं सर्व कामें यंत्रांच्या साहाय्यानें होतात. यामळें एकूण कामाच्या प्रमाणांत पाहिलें तर येथें मजूरवर्ग फारच कमी आहे. अगदीं खालच्या दर्जाचीं हमाली वगैरेंसारखीं कामें करणारे लोक तर फार आढळणारच नाहींत.

या कारखान्याची स्थूल रचना एखाद्या अनभिज्ञालाहि कळावी इतकी रेखीव आणि सुस्पष्ट आहे. मुख्य कारखान्याच्या १ मैल लांब व ½ मैल रुंद या आंखीव चौकोनी क्षेत्राचे चार बाजूंना चार सारखे चौकोनी विभाग पडतात. यांपैकीं पहिल्या विभागांत कारखान्याच्या कामासाठीं लागणारी वीज वाफेच्या साहाय्यानें यंत्रें (turbines) फिरवून निर्माण करण्यांत येते. याच विद्युत्केंद्रावरुन बिहारच्या कांहीं इतर कारखान्यांना व खाणींना वीज पुरविण्यांत येते. यानंतरच्या चौकोनांत गॅसनिर्मितीचीं यंत्रें आहेत. अमोनिआ तयार करण्यासाठीं लागणारा हायड्रोजन व नायट्रोजन तयार करण्याचें काम या विभागांत चालतें. तिसऱ्या विभागांत अमोनिआची निर्मिति होते, व चौथ्या विभागांत अमोनिअम सल्फेट तयार करण्यांत येतें. हेंच सिंद्रीच्या कारखान्यांत तयार होणारें खत.

याखेरीज या खताच्या उत्पादनांत निरुपयोगी म्हणून बाजूला काढलेल्या द्रव्यांपासून दर दिवशीं उत्तम प्रकारचें ३०० टन सिमेंट निर्माण करणारा कारखाना लवकरच येथें निघेल. या कारखान्यांतून निर्माण होणाऱ्या उप-द्रव्यांचा उपयोग करणारे इतरहि रासायनिक वस्तूंचे कारखाने लवकरच येथें निघावयाचे आहेत. सिंद्रीच्या परिसरांतच बिहार सरकारनें बिहार एंजिनिअरिंग कॉलेज काढलें आहे. लोखंड, कोळसा या महत्त्वाच्या वस्तूंनीं समृद्ध असलेला हा बिहारचा भूभाग लवकरच उद्योग-धंद्यांचें एक महत्त्वाचें केंद्र म्हणून पुढें आल्याखेरीज राहणार नाहीं.

भारतांतील अन्नधान्याच्या तुटवड्याची अडचण पाकिस्ताननिर्मितीनंतर आपल्याला विशेष जाणवूं लागली असली, तरी आपलें अन्नधान्याचें उत्पादन कसें वाढवावें हा प्रश्न त्याहि पूर्वीपासून आपल्या-पुढें होताच. अन्नधान्य-धोरणविषयक समिती-( Food-grains Policy Committee )-नें जुलै १९४३ मध्यें असें सांगितलें कीं, भारताला वार्षिक २० ते ३० लाख टनांच्या कृत्रिम खतांची जरुरी आहे व यापैकीं निदान ३५०,००० टन खत तरी दरवर्षी भारतांत निर्माण करण्याची तांतडीनें सोय करणें आवश्यक आहे. अशा खत-कारखान्यांतून निर्माण होणाऱ्या रसायनांचा युद्धांतहि उपयोग होऊं शकेल, हीहि गोष्ट दाखविण्यांत आली आणि अशा तऱ्हेचे कारखाने सरकारनें आपल्या मालकीचे काढावेत असा निर्णय १९४३ च्या अखेरीस युद्धकालांतच घेण्यांत आला.

अशा तऱ्हेचे कारखाने काढण्यासाठीं लागणारीं यंत्रें आपल्याला तयार करतां येत नव्हतीं व कारखाना उभा करण्यासाठीं व चालविण्यासाठीं लागणारे तंत्रज्ञहि पण आपल्या देशांत नव्हते. या वेळीं यंत्रें व तंत्रज्ञ यांचा तुटवडा म्हणजे काय याची कल्पना, अशी एखादी योजना पूर्ण करण्यासाठीं हातीं घेतली म्हणजेच येते. आजहि आपण आपली यंत्रनिर्मिति करूं शकत नाहीं. प्रस्तुत कारखान्याची उभारणी पाश्चात्त्य तज्ज्ञांनींच केली व आज तरी प्रमुख जागांवर पाश्चात्त्य तज्ज्ञच आहेत.

खतनिर्मितीसाठीं लहान लहान पांचसहा कारखाने काढण्यापेक्षां एकच मोठा कारखाना काढणें अधिक फायद्याचें होईल असें तज्ज्ञांचें मत पडलें. या कारखान्यासाठीं कोणती जागा निवडावी हा अर्थातच यानंतर दुसरा महत्त्वाचा प्रश्न पुढें आला. याबाबतींत प्रांताप्रांतांचे मतभेद होते. अनेक प्रांतांना










अनुक्रमणिका

कारखाना आपल्या प्रदेशांत पाहिजे होता व कांहींना कांहीं विशिष्ट खतांचेंच उत्पादन कारखान्यानें करावयास पाहिजे होतें. शेवटीं ३,५०००० टनांच्या एकाच कारखान्यानें कांहीं आपली सर्व गरज भागणार आहे असें नाहीं, पुढील कारखाने काढतांना तुमच्या म्हणण्याकडे अधिक लक्ष देऊं, असें कांहीं सांगून इतर प्रांतांची समजूत काढावी लागली.

सिंद्री हें धनबादपासून १४ मैल अंतरावरचें एक लहानसें खेडें आहे. रिप्लेच्या 'विश्वास ठेवा अगर ठेवूं नका' ( Believe it or Not ) या पद्धतीनेंच लिहावयाचें असल्यास सिंद्रीचा कारखाना सिंद्रीला नाहीं, असेंहि चमत्कृतिजनक विधान आज आपल्याला करतां येण्यासारखें आहे ! सिंद्री गांवाच्या दक्षिणेला दामोदर नदी वाहते. आणि या नदीचा आपला प्रवाह बदलण्याचा धर्म लक्षांत घेऊन कारखान्याची जागा जरा पलीकडे सरकविण्यांत आली आहे. सिंद्री या जागेची निवड करतांना, एक तर कारखान्यासाठीं लागणारा दगडी कोळसा नजीकच्या झरियाच्या खाणींतून मुबलक व सुलभपणें मिळूं शकेल हें एक कारण होतें. दुसरें कारण, रेल्वेवाहतुकीच्या दृष्टीनें हें ठिकाण सोयीचें होतें. या विभागांतून दगडी कोळसा घेऊन रेल्वे वॅगन्स उत्तर-पंजाबकडे जात असत. येतांना अर्थातच त्या रिकाम्या परत आणाव्या लागत. सिंद्रीला कारखाना काढल्यास, या वॅगन्स परततांना उत्पादनासाठीं लागणारें जिप्सम पंजाबमधून आणूं शकतील व दोन्ही बाजूंच्या प्रवासांत त्यांचा पूर्ण उपयोग होऊं शकेल ही कल्पना रेल्वे अधिकाऱ्यांनीं पुढें मांडली व हें युक्त वाटल्यामुळेंहि कारखाना या विभागांत काढण्याचें ठरविण्यांत आलें. पुढें पाकिस्तान झालें आणि आपल्याला जिप्सम पुरविणारा तो प्रदेशच पाकिस्तानच्या क्षेत्रांत गेला. बिकानेर, जोधपूर या विभागांत भरपूर जिप्सम आपल्याला उपलब्ध आहे ही गोष्ट वेगळी. परंतु कारखाना या विभागांत काढण्याचा रेल्वे वाहतुकीच्या दृष्टीनें जो एक प्रमुख हेतु होता तो तरी विफल झाला. पण १९४७ पर्यंत कारखान्याची इतकी पूर्वतयारी झालेली होती कीं जागा बदलणें हेंहि हितावह नव्हतें.

सिंद्रीला पाणीपुरवठ्याचा प्रश्न हा एक बिकट प्रश्न होता. सिंद्रीच्या कारखान्यांतील काम करणाऱ्या लोकांसाठीं पाणीपुरवठ्याची सोय करणें तर आवश्यक होतेंच. परंतु प्रत्यक्ष कारखान्यांतील क्रियांसाठीं पाणीपुरवठा अत्यावश्यक होता. वीजनिर्मिति वाफेच्या साहाय्यानें ( turbines ) यंत्रें फिरवून करावयाची होती. याहि बाबतींत वाफेचें साहाय्य घेणें आवश्यक असण्याचें कारण असें कीं, कारखान्यांतील रासायनिक प्रक्रियांसाठीं वाफेची आवश्यकता आहे व वीजनिर्मितीसाठीं उपयोगांत आणलेलीच वाफ पुढें या कामासाठीं वापरतां येते. त्यामुळें मग मुद्दाम निराळी वाफ तयार करण्याचा प्रश्न राहत नाहीं. कारखाना पूर्णपणें उत्पादन करूं लागला, सीमेंट कारखानाहि सुरू झाला कीं, दर दिवशीं वर लिहिल्याप्रमाणें १ कोटी २० लक्ष गॅलन पाण्याचा पुरवठा लागेल. आजहि ८९ लक्ष गॅलन पाण्याचा पुरवठा दर दिवशीं होत राहणें आवश्यक आहे. इतकें पाणी कोठून मिळवावें हा एक अवघड प्रश्न होता. दामोदर नदी शेजारूनच दक्षिणेला वाहते. परंतु पावसाळ्यांत दुथडी भरभरून वाहावें, नंतर कांहीं दिवस अरुंद प्रवाह चालावा आणि उन्हाळ्यांत तर पात्र ठणठणीत कोरडें पडावें अशी या नदीची रीत आहे ! पाणी तर इतकें काळेंकुळकुळीत कीं तें पिण्याची कल्पनाहि मनाला शिवणार नाहीं. यमुनेला आपण काळी म्हणतों. परंतु यमुनेच्या पाण्याचा नीलश्यामल वर्ण मोहक वाटतो; तर दामोदर नदीच्या पाण्याचा रंग अगदीं डांबरी कोळशासारखा काळा आहे ! याचें कारणहि तिच्या तीरातीरावरून पसरलेल्या दगडी कोळशाच्या खाणीच आहेत. सिंद्रीला सहज उपलब्ध असें पाणी काय तें हें ऐवढेंच. यांतून वर्षभर दिनानुदिन अखंड पाण्याचा पुरवठा मिळवावयाचा होता.

यासाठीं दोन गोष्टी करण्यांत आल्या. एक नेहमींच्या माहितींतील आहे. दामोदर नदीच्याच गोवई नामक एका उपनदीवर बांध घालून तिचें पाणी अडवून सांठविण्यांत आलें आहे. दुसरा उपाय कांहींसा नवीन, गंमतीदार व अपरिचित आहे. दामोदर नदीचें पात्र जरी वरून कोरडें












पडलें तरी त्या रेताड पात्रांतून खोलवर खालच्या दगडी बैठकीवरून तिचा प्रवाह अखंड सुरू असतो. हा प्रवाह पकडण्यासाठी नदीच्या पात्रांत खोलवर एक आडवा लांब मोठा चाळणीचा नळ बांधला आहे. त्याला Infiltration Gallery असें म्हणतात. या नळाच्या सिमेंटच्या भिंतीच्या बाजूस अनेक छिद्रें आहेत व त्यांतून आंत वाहणारें पाणी टाकींत सांठविलें जातें. या पद्धतीनें गेल्या वर्षीं बराच पाणीपुरवठा होऊं शकला. हा प्रयोग या दृष्टीनें आशादायक व कुतूहलजनक आहे. हें गलिच्छ काळें पाणी निवळण्यासाठीं तीन तळ्यांत सोडण्यांत येतें. त्यांना settlement tanks असें म्हणतात. त्यांत गाळ खालीं बसल्यानंतर पुढें रसायनांच्या साहाय्यानें पाण्याचें पूर्ण शुद्धीकरण होतें. पुढें कारखान्यांतील कांहीं टाक्यांत हेंच पाणी एकाद्या श्रीमंतांच्या स्विमिंग क्लबच्या तळ्यांतील पाण्याप्रमाणें नीलवर्णानें चमकतांना पाहिलें कीं एकदोन मैलांच्या अंतरावर आपण पाहिलेलें पाणी तें हेंच, असा विश्वासहि बसत नाहीं ! मोठी 'दामोदर नदी-योजना' पूर्ण झाली कीं अर्थातच हा पाण्याचा प्रश्न अधिकच सुलभपणें सुटूं शकेल.

कारखान्याची जागा तयार करणें, त्या ठिकाणीं आवश्यक त्या सुखसोयींची तरतूद करणें यांसारख्या गोष्टींपासून तें नव्वद नव्वद टन वजनाचीं एक एक अवजारें या ठिकाणीं आणून उभारून प्रत्यक्ष उत्पादनाला सुरुवात करण्यापर्यंतच्या अनेक गोष्टी अनेक व्यावहारिक अडचणींना तोंड देऊन पार पाडाव्या लागल्या. जमीन तयार करावयास १९४५ च्या मध्यास सुरुवात झाली. प्रत्यक्ष कारखान्याच्या उभारणीचें काम १९४६ च्या मध्यावर सुरू करण्यांत आलें. वर लिहिल्याप्रमाणें कांहीं यंत्रविभाग एक एक नव्वद टन वजनाचे असे होते. शंभर टन वजन वाहूं शकणारी अशी मोजकी अवघी एकच वॅगन हिंदुस्थानांत होती. पाकिस्तानशीं भारतानें केलेल्या साधनसामग्रीच्या वांटणींत ही वॅगनहि पाकिस्तानला देण्यांत आली. भाडें घेऊनहि कांहीं काळ ही वॅगन भारताला वापरावयास देण्यास पाकिस्तान कबूल होईना. शेवटीं प्रत्येकीं पन्नास टन वजन वाहूं शकणाऱ्या दोन वॅगन्स विशिष्ट प्रकारें एकत्र जोडून काम पुरें करून घ्यावें लागलें. एखाद्या प्रचंड खटाटोपांत एखादी लहानशी व्यावहारिक अडचणहि खीळ घालण्याचा कसा संभव असतो याचें हें उदाहरण आहे. साडेपांच वर्षे अखंड काम चालविल्यानंतर २० डिसेंबर १९५० रोजीं विद्युदुत्पादन विभाग काम करूं लागला. गॅस विभागाचें कार्य १३ एप्रिल १९५१ रोजीं सुरू करण्यांत आलें. खत तयार करण्याची प्रक्रिया याच विभागापासून होत असल्यामुळें कारखान्याच्या खऱ्या कार्याला या दिवसापासून सुरुवात झाली असें म्हणतां येईल. २८ ऑगस्ट या दिवशीं अमोनिआ पूर्णपणें तयार व्हावयासाठीं लागणाऱ्या सर्व क्रिया सुरू झालेल्या असून, त्या दिवशीं अमोनिआचें पहिलें उत्पादनहि सुरू झालें. ३०-३१ ऑक्टोबरच्या मध्यरात्रीं, या कारखान्यांत तयार करावयाचें अमोनिअम सल्फेट प्रथम तयार झालें. 'तुझ्या हातीं सुवर्णाचें चढावें मोल मातीला' अशी रासायनिक किमया भारतांत सिद्ध होऊं लागली ! या वेळीं रात्रपाळीला सल्फेट विभागावर नित्यानंद फोरमन होता. आपल्या कार्यनेतृत्वाच्या कालांत कारखान्यांतून पहिलें सल्फेट बाहेर पडलें याचा नित्यानंदाला सार्थ आनंद व अभिमान वाटतो. माझ्या मामेभावाच्या हातून भारतांतील या नवयुगप्रवर्तक गोष्टीचा प्रत्यक्ष शुभारंभ व्हावा या सानंद अभिमानानें माझें देखील अंतःकरण भरून येतें; मग त्याला तर त्यांतील नाट्यप्रसंग अधिकच आकर्षक वाटावा यांत नवल काय ? या पहिल्या उत्पादनापैकीं थोडेसें सल्फेट नित्यानंदानें एका कांचेच्या लहानशा टेस्ट-ट्यूबमध्यें सीलबंद करून तारीख घालून ठेवलें आहे. '30-31 Oct. M. N. मिडनाइट' अशी त्या टेस्ट-ट्यूबवर नोंद केलेली आहे. अनेक दशकांनंतर किंवा शतकांनंतरहि भारतांतील पहिलें अमोनिअम सल्फेटचें उत्पादन म्हणून लोक या टेस्ट-ट्यूबचें जतन व प्रदर्शन करतील असा माझा विश्वास आहे. भारताचें एका महत्त्वाच्या नवकर्तृत्वक्षेत्रांतील तें पहिलें पाऊल आहे.

सिंद्रीच्या कारभारांत झालेल्या कांहीं घोटा-








ल्याची चर्चा मध्यवर्ती कायदेमंडळांत करण्यांत आली. त्या वेळीं सिंद्रीचें नांव प्रथम सर्व जनतेपर्यंत जाऊन पोहोंचलें. १९४४ सालीं कारखाना उभा करण्यासाठीं किती खर्च लागल याचा केलेला अंदाज १० कोटी ५३ लक्ष रुपयांचा होता. यानंतर उत्तरोत्तर देशी-परदेशी वस्तूंचे भाव चढत चढत गेले व हा अंदाजी आंकडाहि वाढत गेला. परंतु केवळ यामुळ झालेल्या सर्व अधिक खर्चाचें समर्थन होऊं शकत नाहीं. मूळ आंकडा १९५० मध्यें १८ कोटी १७ लक्षांपर्यंत वर चढला होता. यापैकीं कांहीं वाढ, मूळ अंदाजच त्या प्रमाणांत चुकीचा असल्यामुळें, अपरिहार्य होती; परंतु मुख्य वाढ मध्यंतरींच्या काळांत वाढलेल्या जमिनींच्या किंमतीमुळें व जमिनी हस्तगत करण्यांत झालेल्या दिरंगाईमुळें झाली होती. याखेरीज या दिरंगाईच्या काळांत भारतांतील कच्च्या मालाचे भाव दुप्पट झाले. मजुरीचे दर किती तरी वर चढले व परदेशी वस्तूंच्या किंमतीहि या काळांत वर जात होत्या. अखेर कारखाना उभारला जाऊन सुरू होईपर्यंत प्रत्यक्ष खर्च २३ कोटी रुपयांपर्यंत आलेला होता. आपण अनुभवानेंच शिकतों ही गोष्ट खरी असली, तरी शक्य तितकें लवकर शिकावें व शक्य तितके कमी पैसे खर्च करून अनुभव खरेदी करावा हें चांगलें.

यंत्र-तंत्र-विषयक बाजूंप्रमाणेंच कारखान्याच्या कार्याच्या इतर व्यवहाराच्याहि बाजू आहेत. या सर्वांचें संचालकत्व प्रत्यक्ष आपल्या हातीं ठेवण्यापेक्षां त्यासाठीं एक वेगळी संस्था निर्माण करण्याचा निर्णय सरकारनें घेतला आहे. या संस्थेचें एकूण भांडवल ३० कोटी रुपये असावें व त्यापैकीं १० कोटी ऋणपत्रां-(debentures)च्या रूपानें उभारण्यांत यावेत असेंहि ठरविण्यांत आलें आहे. आजवर २३ कोटी रुपये तर खर्च पडलेहि आहेत. उत्पादन किफायतशीर व्हावें अशी अर्थातच अपेक्षा राहील. आयात अमोनिअम सल्फेटचा भाव टनाला आज सुमारें ३७५ रुपये आहे. तर या कारखान्यांत अमोनिअम सल्फेट तयार करण्याचा खर्च टनामागें २३० त २५० रुपये येईल. यामुळें संरक्षण न मागताहि हा कारखाना नफा मिळवूं शकेल. परंतु सरकारची दृष्टि केवळ नफ्याचीच असण्याचें कारण नाहीं. कारखान्यांत कदाचित् कमी नफा झाला तरी स्वस्त दरांत खत उपलब्ध करून दिल्यानें भारतीय शेतीची जी भरभराट होईल तिचें अधिक महत्त्व आहे. शेतकऱ्याचें एकूण उत्पादन-उत्पन्न वाढलें कीं, त्याचे अप्रत्यक्ष अनेक फायदे राष्ट्राला मिळतीलच. परदेशी खताच्या आयातीसाठीं खर्च करावें लागणारें सुमारें दहा कोटि रुपयांचें परदेशी चलन वांचेल हाहि आजच्या परिस्थितींत एक महत्त्वाचा फायदा आहे. केवळ आर्थिक व्यापारी दृष्टीनेंहि सिंद्री कारखाना यशस्वी होईल अशी आशा बाळगावयास आज तरी कांहीं हरकत दिसत नाहीं. कारखान्याच्या संचालनासाठीं स्वतंत्र संस्था निर्माण केल्यानें व्यापारी तत्त्वावर या कारखान्याचें काम अधिक सुलभपणें चालवितां येईल व प्रत्येक साध्या निर्णयासाठीं 'बहोत दूर' असणाऱ्या दिल्लीवर अवलंबून खोळंबा पण होणार नाहीं.

असा थोडक्यांत सिंद्रीचा इतिहास आहे. सिंद्रीच्या इतिहासापेक्षांहि सिंद्रीचें भविष्य अधिक महत्त्वाचें आहे. भारताचें भविष्यहि त्या भविष्याशीं निगडित आहे. सिंद्रीच्या सकाळच्या धुक्यांत त्या प्रचंड कारखान्याच्या अस्पष्ट रूपरेषा दिसूं लागल्या कीं भारताच्या भव्य भवितव्याचेंच पहिलें अस्पष्टसें दर्शन आपल्याला होत आहे, असें वाटल्याखेरीज राहात नाहीं. हा सर्व विभाग लवकरच औद्योगिक समृद्धीनें गजबजून जाणार आहे. मी रात्रीं सिंद्रीहून परत निघालों त्या वेळीं तारेच्या खांबांतून यावा असा सूं ऽ ऽ असा एक आवाज सतत कारखान्याच्या कार्यक्षेत्रांतून येत होता. प्रशान्त वातावरणांतील ती एक कार्यमग्नतेची समाधि होती. कमी-अधिक उंचीवरील झगझगत्या विद्युद्दीपांनीं कारखान्याची सदाची दिवाळी साजरी होत होती. सिंद्री ते धनबाद हा प्रवास टॅक्सींतून करीत असतां, नुकत्याच घडविलेल्या नितळ रस्त्याची सुखद संवेदना टॅक्सीच्या गतीबरोबर शरीराला जाणवत होती आणि झरियाच्या कोळशाच्या खाणींच्या विभागांत एकामागून एक लागलेल्या तेजस्वी विद्युद्दीपांच्या माला नेत्राला सुखवीत होत्या. सिंद्रीचें भाग्यवैभव असेंच सदैव वाढतें राहो !








पंडित सुंदरलाल : अनु.—श्री. श्रीपाद जोशी

# नव चीनचा संदेश

१ ऑक्टोबर १९५१ रोजीं नवचीनच्या लोकसत्ताकाचा दुसरा वाढदिवस होता. हिंदुस्थानांतील व इतर देशांतील शिष्टमंडळांनीं आपल्या या आनंदोत्सवांत भाग घ्यावा अशी इच्छा चीनमधील कित्येक संस्थांच्या मनांत उत्पन्न झाली. म्हणून त्यांनीं नवी दिल्ली येथील चिनी राजदूतामार्फत हिन्दी लोकांना आपलें एक शिष्टमंडळ पाठवून देण्याची विनंति केली. शिष्टमंडळामध्यें सर्व प्रांतांतील व वेगवेगळ्या विचारसरणींचे लोक असावेत असा प्रयत्न करण्यांत आला.

शिष्टमंडळांत १३ सभासद आणि २ मंत्री होते. आम्ही चीनमध्यें ३९ दिवस राहिलों. दक्षिणेपासून उत्तरेपर्यंतचीं सात मोठमोठीं चिनी शहरें—कँटन, पेकिंग, मुकडेन, टिन्ट्सिन, नानाकिंग, शांघाय आणि हांग चू हीं आम्हीं पाहिलीं. नव चीनचीं विश्वविद्यालयें, शाळा, कॉलेजें, खासगी व सरकारी कारखाने, खेडीं व बाजारपेठा सर्वांना आम्हीं भेटी दिल्या. तेथील न्यायालयांचें काम पाहिलें, चीनच्या नवीन लोकसंघटनांची कार्यपद्धति समजावून घेतली, तेथील सिनेमा, नाटकें, ग्रामीण व हस्तकौशल्याचीं प्रदर्शनें पाहिलीं. आमच्यावर कसलेहि निर्बंध नव्हते. सरकारचे लोक आणि जनता दोघांनींहि आम्हांला अत्यंत प्रेमानें वागविलें आणि मनमोकळेपणानें आमच्याशीं गप्पागोष्टी केल्या.

चीनचा दौरा करून आल्यानंतर आमच्यापैकीं प्रत्येकाच्या मनांत असा विचार आला कीं, हिंदुस्थानला चीनपासून काहीं शिकतां येईल काय ? आणि जर शिकतां येण्यासारखें कांहीं असेल तर तें काय व त्यायोगें आमच्या देशाची स्थिति कशी सुधारेल ?

चिनी लोक आपल्या नवीन लोकराज्याच्या प्रस्थापनेला 'स्वातंत्र्य' ( लिबरेशन ) असें म्हणतात. स्वातंत्र्यापूर्वीं चीनमध्यें कागदी नोटांचा इतका सुळसुळाट झालेला होता कीं, १९३९ च्या लढाईपूर्वीं जितक्या नोटा चलनांत होत्या त्यांच्या १७७० खर्वपट ( १७७०,००० कोटी पट ) नोटा सन १९४० ते १९४८ च्या दरम्यान् प्रसारांत आल्या होत्या. चीनच्या पीपल्स बँकेच्या प्रमुखाकडूनच आम्हांला ही माहिती मिळाली. वस्तूंचे भाव इतके भयंकर वाढले होते कीं ऐकून मन थक्क होई. लढाईपूर्वीं ज्या माणसाला शंभर रुपये पुरत असत त्यालाच आतां १३८८ ते ४००० खर्व रुपये लागूं लागले. याचा अर्थ असा कीं, एखाद्याजवळ दहा हजार चिनी डॉलर असतील तर तेवढ्या पैशांनीं तो आगपेटींतील एक काडी देखील विकत घेऊं शकत नव्हता ! मग सबंध आगपेटीची तर गोष्ट दूरच राहिली. शिवाय लोक असें सांगतात कीं, त्या काळांत चीनमध्यें जितके लांचखोर अधिकारी होते तितके जगांत अन्यत्र कोठेंहि नसतील. मोठमोठे कारखानदार, लष्करी सामानाचा व्यापार करणारे, जमीनदार व अमीर-उमराव ऐषआरामांत व विलासांत लोळत होते. परंतु करोडों लोक

---

'नया हिंद' या अलाहाबादहून निघणाऱ्या एकमेव हिंदुस्थानी मासिकाच्या, डिसेंबर १९५१-च्या अंकांतील लेखावरून अनुवादित.








गरीबी व असहायता यांच्या जात्यांत भरडले जात होते. यामुळें बेकार, वेश्या आणि भिकारी यांची चीनमध्यें बेहद्द वाढ झाली.

१९४९ सालीं नवें सरकार राज्यावर येतांच त्यानें देशांतील गरिबी नाहींशी करून धान्योत्पादन वाढविण्याचा निश्चय केला. चीनच्या साडेसत्तेचाळीस कोटि लोकसंख्येपैकीं एकेचाळीस कोटि लोक सर्वस्वीं शेतीवर अवलंबून असलेले शेतकरी आहेत ही गोष्ट नव्या सरकारनें ओळखली. सगळी जमीन १० टक्के जमीनदार किंवा श्रीमंत शेतकरी यांच्या ताब्यांत होती आणि बाकीचे ९० टक्के गरीब शेतकरी किंवा शेतमजूर होते. चीनमध्यें शेतीला योग्य अशा १४० कोटि मौ ( २४ कोटि एकर ) जमिनीपैकीं ८० टक्के जमीन जमीनदार व श्रीमंत शेतकरी यांच्या मालकीची होती आणि २० टक्के शेतकरी व शेतमजूर यांच्या ताब्यांत होती आणि त्यांची संख्या शेतीवर अवलंबून असणाऱ्या लोकांच्या ९० टक्के होती.

ही अंदाधुंदी नष्ट करण्याचा निश्चय नव्या सरकारनें केला. व त्याप्रमाणें **नवा जमीन-सुधारणा-कायदा** पास केला. त्या कायद्यानुसार जमीनदारांजवळील सर्व जास्ती जमीन काढून घेऊन ती भूमिहीन शेतमजुरांना वाटून दिली. अर्थात् असें करतांना कोणत्याहि जमीनदारांचीं मुलेंबाळें उपाशीं मरणार नाहींत व आपल्या कुटुंबांचा चरितार्थ त्यांना चालवितां येईल अशी खबरदारी सरकारनें घेतली. सामान्य शेतकऱ्याला जेवढी जमीन देण्यांत येई तेवढी प्रत्येक जमीनदाराकडे राहूं देण्यांत आली. कधीं कधीं त्यापेक्षां जास्त जमीनहि जमीनदाराला देण्यांत येई. यामुळें जमीनदारांना आपल्या कुटुंबांचा चरितार्थ व्यवस्थितपणें चालवितां येऊं लागला. ज्याच्याजवळ जितके दागदागिने व रोकड होती ती सर्व त्याच्याजवळच राहूं देण्यांत आली. शिवाय ज्या जमीनदाराजवळ एकादा कारखाना होता अथवा तो जो धंदा करीत होता त्याची मालकीहि तशीच राहूं दिली. इतकेंच नव्हे, तर सरकारनें अशा कामामध्यें जमीनदारांना मदत करून त्यांचा उत्साह वाढविला.

हा जमीनसुधारणा-कायदा म्हणजे आपल्या नवीन अर्थव्यवस्थेचा पायाच आहे, असें चीनचे नवे राज्यकर्ते मानतात. हा सर्व चमत्कार सरकारी अधिकारी अथवा हुकुमनामे यांच्या द्वारें घडवून आणलेला नसून स्वतः जनतेनेंच तो करून दाखविला आहे. गांवांतील सर्व लोक गोळा होऊन जमीनसुधारणेच्या बाबतींत काय केलें पाहिजे व जमिनीची वांटणी कशी झाली पाहिजे यासंबंधीं विचार विनिमय करीत. या कायद्यामुळें आज चीनमध्यें ३० कोटि भूमिहीन मजूर जमिनीचे मालक बनले आहेत आणि मोठ्या आनंदानें आपल्या शेतांत राहत आहेत. १९५२ च्या जूनपर्यंत हा शेतीसुधारणेचा कायदा सबंध चीनभर अंमलांत आणतां येईल अशी उमेद आहे.

आपल्या देशांतील धान्योत्पादन वाढविण्यासाठीं चिनी सरकारनें जमीनमहसुलाच्या पद्धतींत क्रांति केली आहे. स्वातंत्र्यापूर्वी जमीनमहसूल चलनी नाण्यांत वसूल केला जाई. परंतु आतां तो धान्याच्या रूपानें घेतला जातो. पूर्वी जमिनीचा सारा एकूण उत्पादनाच्या अर्ध्याहूनहि जास्त असे. कधींकधीं तर सर्वच्या सर्व उत्पन्न शेतसाऱ्यांतच संपून जाई आणि बिचाऱ्या शेतकऱ्याला पोटासाठीं एकादा उद्योगधंदा शोधावा लागे. परंतु आतां नव्या सरकारनें असें ठरवून दिलें आहे कीं, कोणत्याहि परिस्थितींत शेतसारा हा उत्पन्नाच्या १३ टक्क्यांहून अधिक असतां कामा नये. अशा प्रकारें शेतसारा कमी केल्यामुळें चिनी शेतकऱ्याजवळ एका वर्षांत दोन कोटि टन धान्य खासगी उपयोगासाठीं शिल्लक उरतें, असें पेकिंगच्या मेयरनीं आम्हांस सांगितलें.

नव्या सरकारनें पाणीपुरवठ्याच्या पद्धतींतहि खूप सुधारणा केली. पुष्कळशा जमिनी अशा होत्या कीं, जेथें पाण्याची व्यवस्था उत्तम प्रकारें झाल्यास खूपच उत्पादन वाढलें असतें. ही गोष्ट लक्षांत येतांच सरकारनें लाखों विहिरी खोदविल्या. अर्थात् या कामीं सरकारकडून थोडीशी मदत आणि प्रोत्साहन यांची जरूरी होती. बाकी सर्व जनतेनेंच केलें. शारीरश्रम तर केलेच, परंतु आवश्यक सामानहि आपणहून कामीं लावलें. याचप्रमाणें ज्या भागांत








नेहमीं पूर येत असत त्या भागांतून जास्त झालेलें पाणी काढून टाकण्याच्या योजना सरकारनें तयार केल्या आणि ज्या भागांत नेहमीं अवर्षण पडत असे तिकडे तें पाणी लावून दिलें. हें कामहि लोकांच्या सहकार्यानेंच करण्यांत आलें. सरकारनें फक्त देखरेख ठेवली. लहान योजनांप्रमाणेंच हुआई नदीच्या धरणासारख्या मोटमोठ्या योजनांमध्येंहि सरकारनें लोकांचें सहकार्य घेतलें. या हुआई नदीच्या योजनेंत नोव्हेंबर १९५० मध्यें सुरुवात झाली. या योजनेंत ३० लाख शेतकऱ्यांनीं भाग घेतला. त्यांनीं नोव्हेंबर १९५० पासून जुलै १९५१ पर्यंत सुमारें १९ कोटि ५० लाख मीटर्स माती उकरली आणि नद्यांना अडविण्यासाठीं जागजागीं हौद व कुंडें बांधलीं. यामुळें साडेपांच कोटि लोक पुरांच्या संकटांतून कायमचे मुक्त झाले. या प्रदेशांत नुकतेंच पहिलें पीक आलें तें इतकें अमाप होतें कीं, तें पाहून प्रत्येकाचें हृदय आनंदानें नाचूं लागलें. या योजनांसाठीं चीनच्या पुढाऱ्यांनीं परदेशांकडून एक पैसाहि उसनवार घेतलेला नाहीं, ही गोष्ट विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

नवचीनच्या सरकारनें राज्यकारभाराचा खर्च खूपच कमी केला. स्वातंत्र्यापूर्वी बहुतेक सरकारी नोकरांना मोठमोठे पगार मिळत आणि पाण्यासारखा पैसा खर्च होई. नवीन सरकारनें उच्चपदस्थ अधिकाऱ्यांचे पगार कमी करून खालच्या नोकरांचे पगार वाढविले. रुपये-पैसे हे महत्त्वाचे नसून माणसाची श्रमशक्ति हीच खरी मौल्यवान् वस्तु आहे ही गोष्ट नवचीनच्या नेत्यांनीं ओळखली आणि म्हणूनच नवचीनमध्यें पगार पैशांमध्यें न देतां धान्याच्या हिशेबानें देण्यांत येतात.

सरकारी नोकर दोन प्रकारचे आहेत : ( १ ) ज्यांना पुरवठा-पद्धतीनें पगार देण्यांत येतो असे आणि ( २ ) ज्यांना पद्धतशीर पगार मिळतो असे. ' पुरवठा-पद्धती ' मध्यें नोकरांना व त्यांच्या मुलाबाळांना पोटभर अन्न आणि पुरेसे कपडे देण्यांत येतात. त्यांच्या मुलांना शिक्षण मोफत मिळतें आणि घरांतील सर्व मंडळींना औषधपाणी विनामूल्य मिळतें. शिवाय वरखर्चासाठीं दरमहा दहा-वीस रुपये देण्यांत येतात. या पुरवठा-पद्धतीमध्यें प्रान्ताचा गव्हर्नर आणि कचेरींतील मामुली कारकून यांच्यांत कांहीं भेद केला जात नाहीं. दुसऱ्या म्हणजे पगारी पद्धतीमध्यें अमुक नोकराला व त्याच्या कुटुंबियांना एकूण किती धान्य, किती दूध, किती औषधपाणी, किती कपडेलत्ते वगैरे लागतील याचा हिशेब करण्यांत येतो आणि मग त्याचे घटक ( पॉंइंट्स ) तयार करतात व अशा प्रकारें अमुक व्यक्तीला किती ' घटक ' लागतील हें ठरविण्यांत येतें. ही रक्कम धान्याच्या रूपानें न देतां धान्याच्या किंमतीइतक्या चलनी नोटा त्याला देण्यांत येतात. एखाद्या महिन्यास धान्याचे भाव बदलले तर त्या प्रमाणांत त्या व्यक्तीचा त्या महिन्याचा पगारहि कमीजास्त होतो.

आपल्या हिंदुस्थानांतील चलनी नाण्यांच्या हिशेबानें नवचीनच्या सरकारी नोकरांना किती पगार मिळतो हें पाहूं. चीनमध्यें सर्वांत मोठा पगार सुमारें ६०० रुपये आहे. चेअरमन माओ-त्से-तुंग यांना इतका पगार मिळतो. मध्यवर्ती मंत्रिमंडळांतील मंत्र्यांना ४०० रुपये मिळतात. सरकारी कारखाने, फौज, युनिव्हर्सिटी, शाळा, कॉलेजें व कचेऱ्या यांतून सामान्यतः सर्वांत अधिक पगार ३५० रुपये आणि सर्वांत कमी १५० रुपये आहे. खासगी कारखाने व कचेऱ्या यांतूनहि अशीच स्थिति आहे. ( कांहीं थोड्या विशेषज्ञांना मासिक पगाराव्यतिरिक्त एक तृतीयांश पगार भत्याच्या रूपानें मिळतो. ) या पद्धतीमुळें एकीकडून सरकारचा खर्च पुष्कळच कमी झाला आहे तर दुसरीकडून जास्तींत जास्त व कमींत कमी पगार मिळविणाऱ्यांतील खाई पुष्कळच कमी झालेली आहे. गरीब-श्रीमंत हा भेद कमी झाला आहे आणि समाजामध्यें संपत्तिमान् व दरिद्री यांच्यांत असलेली भिंत नेस्तनाबूत झाली आहे. याचा परिणाम असा झाला आहे कीं, नवचीनमध्यें माणसाच्या कपड्यांवरून तो युनिव्हर्सिटीचा व्हाइस-चॅन्सेलर आहे कीं एखादा चपराशी आहे, कारखान्याचा मॅनेजर आहे कीं मामुली मजूर आहे, ऑफिसचा इन्‌चार्ज आहे कीं साधा कारकून आहे, हें ओळखतां येत नाहीं. लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही आहे कीं, हा सर्व त्याग लोकांनीं आनंदानें केलेला आहे !

कोमिंगटांग-सरकारच्या राजवटींत बादशाहीचीं








बहुतेक सर्व साधनें नष्ट-भ्रष्ट झालेलीं होतीं. त्यांची नवचीननें पुन्हां घडी बसविली. २२ हजार किलो-मीटर लांबीच्या ज्या सडका नादुरुस्ती व दुर्लक्ष यांमुळें निरुपयोगी होऊन पडलेल्या होत्या त्या १९५० च्या अखेरपर्यंत पुनः चालू झाल्या आणि शिवाय नवीन नवीन रस्ते तयार करण्यांत आले. स्वातंत्र्या-पूर्वीं जितके रस्ते व लोहमार्ग होते त्यांची संख्या १९५१ च्या जानेवारींत पांचपट झाली. टपालाचे मार्ग ६० टक्क्यांनीं वाढले, तार ३६ टक्के आणि टेलीफोन सव्वादोनपट वाढले आहेत. विमान-मार्गांचाहि पुष्कळच उपयोग केला जात आहे.

स्वातंत्र्यापूर्वीं एका अमेरिकन डॉलरची किंमत कित्येक अब्ज-खर्व चिनी येन होती ती १९५० मध्यें ४२ हजार येन आणि १९५१ मध्यें २२२७० येनपर्यंत खालीं उतरली. मार्च १९५० ते मे १९५० या तीन महिन्यांच्या अवधींत पद्धतशीरपणें किंमती स्थिर केल्या गेल्या. त्यायोगें वस्तूंचे भाव खालीं घसरून ते १०० वरून ९८ वर आले आणि अजूनहि खालीं येत आहेत. याच्या उलट याच अवधींत अमेरिकेमध्यें हे भाव १०० वरून १५० पर्यंत चढले.

चीनच्या वेगवेगळ्या भागांत लोकांची क्रय-शक्ति ३० पासून ५३ टक्क्यांपर्यंत वाढली आहे. गेल्या दोन वर्षांत ईशान्य चीनमधील ( यांत पांच प्रांत आहेत ) शेतकऱ्यांची क्रयशक्ति ६९ टक्क्यांनीं वाढली. नवें सरकार १९४९ सालीं अधिकारावर आलें आणि १९५० सालीं देशाचा सारा नूरच बदलला ! त्याच वर्षीं धान्योत्पादन इतकें वाढलें कीं, खेड्यांतील साडेपंचवीस कोटि लोक, शहरांतील आठ कोटि लोक आणि गत-वर्षीं दुष्काळ पडलेल्या भागांतील साडेचार कोटि लोक इतक्या लोकांना पोटभर अन्न मिळून शिवाय साडेचार कोटि लोक वर्षभर जगूं शकतील इतकें धान्य जास्त उरलें. १९५० सालीं मागील वर्षापेक्षां १४ टक्के उत्पादन जास्त झालें. आणि १९५१ सालीं १९५० पेक्षां ८ टक्के उत्पन्न जास्त वाढलें. १९५१ च्या अखेरीस चीनजवळ इतकें धान्य असेल कीं, आपल्या सर्व लोकसंख्येला भरपूर अन्न देऊन व पुढच्या विकासाठीं पुरेसा साठा ठेवून दहा कोटि लोकांना वर्षभर पुरेल इतकें धान्य त्याच्याजवळ शिल्लक राहील असा अंदाज आहे.

चीनमध्यें प्रत्येक सैनिक रोज सात-आठ तास शेती किंवा इतर उद्योग करतो. जे सैनिक प्रत्यक्ष रणांगणावर लढत असतात त्यांनाच फक्त या शेतकामांतून सुट्टी मिळते. त्यामुळें केवळ सैन्याचा खर्चच कमी येतो असें नव्हे, तर शेतीचें उत्पादनहि वाढतें आणि सैनिक व सर्वसामान्य नागरिक यांच्यांतील भ्रातृभाव कायम टिकतो.

आहाराप्रमाणेंच इतर बहुतेक सर्वच वस्तूंच्या बाबतींत चिनी लोक या दोन वर्षांमध्यें स्वावलंबी बनलेले आहेत. या बाबतींत त्यांनीं एक विशिष्ट पद्धति अंमलांत आणली आहे. ती म्हणजे चढाओढ ( एम्युलेशन ड्राईव्ह ). जो मजूर अथवा कारागीर अपेक्षेहून जास्त उत्पादन करतो किंवा आपल्या कामामध्यें एखादा शोध लावतो त्याची चीनमध्यें खूपच प्रशंसा होते आणि सर्व देशभर त्याच्या नांवाला प्रसिद्धि मिळते. 'आदर्श कार्यकर्ता', 'बहादुर मजूर', 'प्रांतिक बहादुर मजूर' किंवा 'अखिल-चीन बहादुर मजूर' अशा पदव्या त्याला देण्यांत येतात.

आपल्या देशांत कारखाने वाढविण्याचा आटोकाट प्रयत्न चिनी पुढारी करीत आहेत. परंतु त्याचबरोबर आपल्या देशांत एकहि व्यक्ति निष्क्रिय राहतां कामा नये, हें ओळखण्याइतके ते व्यवहार-चतुरहि आहेत. त्यांनीं आपल्या देशांतील ग्रामीण उद्योगधंद्यांचें नीट जतन केलें आहे. चीनची राजधानी पेकिंग या ठिकाणीं एक सबंध पेठच्या पेठ अशी आहे कीं, जेथें रोज सकाळीं ६ वाजल्या-पासून ९ वाजेपर्यंत फक्त हातांनीं विणलेलें कापडच मिळतें. त्यांतील कांहीं सूत हातानें कांतलेलें असतें तर कांहीं गिरणीचें असतें. चिनी लोक हातांनीं कांतलेल्या व हातांनीं विणलेल्या कापडाला 'शुपु' असें म्हणतात. डॉक्टर जे. सी. कुमारप्पा, मी व इतर कांहींजण असे त्यांच्या खेड्यांत गेलों व त्या ठिकाणीं चालत असलेले त्यांचे चरखे व माग आम्हीं पाहिले. त्यांचीं उपकरणें आमच्या येथील उपकरणांच्या मानानें जास्त साधीं व कमी गुंता-







गुंतीचीं आहेत. शांघायमध्यें एके ठिकाणीं जुन्या पद्धतीच्या २०० चरख्यांवर खराब व निरुपयोगी झालेली लोंकर कांतून सूत काढण्याचें काम चाललेलें होतें. हातसुताच्या व हातविणीच्या कापडाविषयीं आम्हांला विशेष आपुलकी वाटते हें लक्षांत येतांच, आमच्या चिनी यजमानांनीं आमच्या शिष्टमंडळांतील प्रत्येक सभासदाला चिनी खादीचीं दोन दोन ठाणें भेट म्हणून दिलीं.

आज चीनमध्यें खाण्यापिण्याची प्रत्येक वस्तु भरपूर मिळते. आणि तीहि प्रत्येकाला विकत घेतां येईल इतक्या स्वस्त दरामध्यें. तेथें भावनियंत्रण नाहीं अथवा अन्न-वस्त्रांचें रेशनिंगहि नाहीं. तेथील ट्रेड-युनियन संस्था योग्य किंमती ठरवून देतात. तेथें दरासंबंधीं घासाघीस करावी लागत नाहीं, काळाबाजार अथवा कोणी सांठेबाजीहि करीत नाहीं. सट्टेबाजीमुळें मालाच्या किंमती कृत्रिमरीत्या कमी-जास्त होत असतात. म्हणून सट्ट्याला सरकारनें बंदी घातलेली आहे.

आतां नवीन सरकारनें काय काय सामाजिक सुधारणा केल्या आहेत तें आपण पाहूं. पेकिंगच्या बाबतींत असें सांगतात कीं, नवीन सरकार राज्यावर आलें त्या वेळीं त्या शहरांत तीन हजार वेश्या होत्या. परंतु तेथें आज एकहि वेश्या नाहीं ! हीच स्थिति इतर शहरांची व लहान-मोठ्या गांवांची होती. परंतु नवीन सरकारनें एवढ्या मोठ्या देशांतून वेश्यावृत्तीचें समूळ उच्चाटण केलें. अर्थात् ही सुधारणा केवळ सरकारी कायद्याच्या बळावर अथवा दंडुकेशाहीनें घडवून आणलेली नसून, लोकांच्या इच्छेनें व त्यांना नीट समजावून सांगून केलेली आहे. उपपंतप्रधान श्री. को-मो-जो यांनीं यासंबंधींची सर्व हकीगत आम्हांला सांगितली. त्या दुर्दैवी स्त्रियांची समजूत घालून त्यांना त्या धंद्यांतून बाहेर काढण्यांत आलें. त्यांच्यासाठीं नवीन नवीन हस्तोद्योग शिकविण्याची सोय करण्यांत आली. त्यायोगें त्यांना स्वाभिमानानें आपलें पोट भरतां येऊं लागलें. प्रतिष्ठित लोकांशीं त्यांचीं लग्नें लावून देण्यांत आलीं आणि अशा प्रकारें मानवसमाजावरील हा कलंक धुऊन टाकण्यांत आला. याचप्रमाणें नवचीनमधून भिक्षावृत्तीचेंहि समूळ उच्चाटन करण्यांत आलें.

पूर्वीं भीक मागणारे सर्व लोक आतां कोणत्या ना कोणत्या उत्पादक उद्योगांत गुंतले आहेत. आज चीनमध्यें बेकारी नाहीं. आम्ही पेकिंगच्या मेयरना विचारलें, " तुमच्या येथें लोकसंख्येचा प्रश्न कितपत बिकट आहे ? " त्यावर त्यांनीं हंसून उत्तर दिलें, " आमच्या येथें लोकसंख्येचा प्रश्नच नाहीं. वाटल्यास तुमच्या येथील कांहीं लोकांना खुशाल आमच्याकडे धाडून द्या. "

शहरांमध्यें लोकांना राहण्यास पुरेशी सोय आहे. सर्व देशामध्यें अफू खाण्याची किंवा ओढण्याची सक्त मनाई आहे. कोणत्याहि प्रकारचा जुगार, सट्टा किंवा रेस यांना पूर्ण बंदी आहे. लग्नासंबंधींचा जो नवीन कायदा तेथें नुकताच झालेला आहे तो विशेष महत्त्वाचा आहे. त्यायोगें स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीनें अधिकार मिळाले आहेत, त्यांचा दर्जा वाढला आहे आणि स्त्री-पुरुषांनीं एकच लग्न करण्याची प्रथा ( एकपत्नीव्रत ) सुरू झालेली आहे. लग्नाच्या व्यवहारांत पैशांची देवाणघेवाण पूर्णपणें बंद झाली आहे. या सर्व कारणांमुळें आज तेथील सामाजिक व इतर जीवनामध्यें स्त्री ही पुरुषाच्या बरोबरीनें भाग घेत आहे. टिन्टसिन-पेकिंग रेल्वेवर ड्रायव्हरपासून गार्डापर्यंत सर्व जागांवर स्त्रियाच काम करीत आहेत.

आम्हीं नवचीनमधील सिनेमा व नाटकें पाहिलीं. त्यांच्यापासून पुष्कळच शिकतां येण्यासारखें आहे. बहुतेक सिनेमा-नाटकांतून सरंजामशाही, भांडवलशाही व साम्राज्यशाही यांचे दोष व दुर्गुण दाखविण्यांत येतात. या सर्व आपत्तींवर तोडगा म्हणून चिनी लोकांनीं आपली एक नवीन ' शाही ' तयार केली आहे. तिला ते ' राष्ट्रीय भांडवलशाही ' असें म्हणतात. आणि तिच्याविषयीं लोकांमध्यें आपलेपणा निर्माण करण्याचा प्रयत्न चालू असतो. येथील सिनेमांतून स्त्री-पुरुषांच्या समान हक्कांवर अत्यंत भर देण्यांत येतो. परिश्रमाला सर्वांत उच्च स्थान दिलें जातें आणि विश्वबंधुत्वाच्या सिद्धान्ताचा प्रचार करण्यांत येतो. प्रेक्षकांच्या अंतःकरणावर आणि बुद्धीवर प्रभाव पाडणाऱ्या इतरहि अनेक गोष्टी त्यांतून








असतात. परंतु कोणत्याहि फिल्ममध्यें अश्लील अथवा हीन अभिरुचीची गोष्ट आम्हांला आढळली नाहीं.

नवचीननें आपल्या न्यायालयांचें स्वरूप संपूर्णपणें पालटून टाकलें आहे. ज्याप्रमाणें आपल्याकडे जिल्हा-न्यायालयें ( डिस्ट्रिक्ट कोर्ट्स ), प्रांतिक हायकोर्ट आणि सुप्रीम कोर्ट आहे त्याप्रमाणें चीनमध्येंहि तीन प्रकारचीं न्यायालयें आहेत. पाश्चात्य पद्धतीची वकिलीची प्रथा आतां चीनमध्यें उरलेलीच नाहीं. वकील व बॅरिस्टर नामशेष झाले आहेत. वादी, प्रतिवादी आणि साक्षीदार यांच्याशीं न्यायाधीश स्वतःच समोरासमोर बोलून चौकशी करतात, गुन्ह्याच्या जागीं जाऊन तपास करतात आणि मग निकाल देतात. जरूर पडल्यास कायदेपंडितांची सल्ला घेतात. या कायदेपंडितांना 'जनतेच्या हक्कांचे राखणदार' असें म्हणतात. त्यांना सरकारकडून पगार मिळतो, कोणत्याहि पक्षकाराकडून एक पैसाहि घेतां येत नाहीं. यामुळें नवचीनमध्यें न्याय खूप स्वस्त झाला आहे. तो फार लवकर मिळतो आणि खराहि असतो. ही गोष्ट इतर देशांत क्वचितच आढळते.

चीनमध्यें संपूर्ण धार्मिक स्वातंत्र्य आहे. आम्हीं अनेक मशिदी, गुरुद्वारें आणि मंदिरें पाहिलीं. तेथें लोक आपापल्या इच्छेप्रमाणें पूजा-प्रार्थना करीत होते; परंतु दुर्दैवाची गोष्ट अशी कीं, चीनमध्यें जें धर्मस्वातंत्र्य अथवा भाषणस्वातंत्र्य आहे त्यासंबंधीं चीनबाहेरील देशांत नाना प्रकारचे गैरसमज पसरलेले आहेत. म्हणून आम्ही या ठिकाणीं चिनी राज्यघटनेचें पांचवें कलम देत आहोंत : " चिनी लोकराज्यामध्यें लोकांना विचार, भाषण, प्रकाशन, गांठीभेटी, पत्रव्यवहार, राहणीकरणी, हालचाल, धार्मिक मत, मिरवणुकी काढणें आणि निदर्शनें करणें या बाबतींत संपूर्ण स्वातंत्र्य राहील. " त्यावरून हे गैरसमज किती चुकीचे आहेत हें लक्षांत येईल. नवचीनचें सरकार कम्युनिस्ट सरकार नाहीं. किंवा एका पक्षाचें सरकारहि नाहीं. वस्तुतः तें संयुक्त सरकार ( कोॲलिशन ) आहे. त्यांत सर्व राजकीय पक्षांचे प्रतिनिधी शामील आहेत. सरकारी नोकरांपैकीं फक्त एकतृतीयांश लोक कम्यूनिस्ट पार्टीशीं संबंध असलेले आहेत.

सर्व चीनभर खासगी संपत्ति बाळगण्याचा हक्क मान्य करण्यांत आलेला आहे आणि त्याप्रमाणें लोकांजवळ खासगी मालमत्ता आहेहि. खासगी व्यापार, देवाण-घेवाण आणि कारखाने यांना साहाय्य देण्यांत येतें. टिंट्सिन, शांघाय आणि इतर शहरें या ठिकाणीं इंग्रजी कंपन्या खूप व्यापार करीत असलेल्या आम्ही पाहिल्या. नवीन चीन कम्युनिस्ट असलाच तर त्याचा कम्युनिझम हा 'चिनी कम्युनिझम्' आहे व चिनी जीवनाशीं त्याचा मेळ घालण्यांत आलेला आहे.

नवचीनमध्यें तीन गुणांवर विशेष भर देण्यांत येतो : ( १ ) प्रामाणिकपणा, ( २ ) साधेपणा, ( ३ ) देशसेवा. चिनी राज्यघटनेमध्यें या तीन गुणांना खास स्थान देण्यांत आलें आहे. चिनी जनता व चिनी सरकार एकजुटीनें हे तिन्ही गुण अंमलांत आणण्यासाठीं मनापासून झटत आहेत.

सध्यां चीन कोरियांत लढत आहे. तरी देखील चीनमध्यें आम्हांला लढाईची चर्चा फारच क्वचित् एकावयास मिळाली. चीनचें आर्थिक संघटन युद्धाला लक्ष्य बनवून तयार केलेलें नाहीं तर दैनंदिन गरजेच्या वस्तू निर्माण करणें हा त्याचा हेतु आहे. युद्धक्षेत्रापासून जवळच असलेल्या मुकडेन शहरांत सर्व व्यवहार पूर्वीप्रमाणेंच सुरळीतपणें चालू असल्याचें आम्हांला दिसून आलें. चीननें गेल्या दोन वर्षांत जो चमत्कार करून दाखविला आहे तो पाहिला म्हणजे नवचीनचे महान् व लाडके नेते माओ-त्से-तुंग हे फक्त एक शूर शिपाईच आहेत असें नव्हे, तर ते एक रचनात्मक कार्यकर्तेहि आहेत असेंच कोणीहि म्हणेल.

चीनप्रमाणेंच हिन्दुस्थानहि जगांतील सर्व देशांबरोबर शांततेनें राहूं इच्छितो. हिंदुस्थान व चीन या दोघांची मिळून लोकसंख्या जगाच्या लोकसंख्येच्या एकतृतीयांशाहून अधिक आहे. यामुळें हिंदुस्थान व चीन यांच्यांत कायम स्वरूपाची व दृढ मैत्री निर्माण झाल्यास जगामध्यें शांतता प्रस्थापित होण्यास त्यायोगें अत्यंत मदत होईल यांत मुळींच शंका नाहीं.



अनुक्रमणिका






गेल्या तत्त्वज्ञानपरिषदेंतील अध्यक्षीय भाषणांकडे दृष्टिक्षेप : प्रा. ल. ब. हरोलीकर

# तत्त्वज्ञानक्षेत्रांतील कांहीं प्रचलित समस्या

भारतीय तत्त्वज्ञान-सभेचें २६ वें वार्षिक अधिवेशन नुकतेंच गेल्या नाताळांत पुणें विद्यापीठाच्या विद्यमानें पुणें शहरांत भरविण्यांत आलें होतें व तें संघटन व व्यवस्था या दृष्टीनें अतिशय यशस्वी रीतीनें पार पडलें हें आतां सर्वांस विदितच आहे. स्वागत-समिति, तिचें कार्यकारी मंडळ आणि कार्यवाह व त्यांचे मदतनीस या सर्वांनीं अधिवेशनाची सर्व व्यवस्था अतिशय उत्कृष्ट ठेवल्याबद्दल परस्थ पाहुण्यांनीं वेळोवेळीं प्रशंसेचे उद्गार काढून कार्यकर्त्यांना धन्यवाद दिले हें अधिवेशनाच्या यशस्वितेचें एक महत्त्वाचें गमक होय, यांत संशय नाहीं. तथापि, अशा अखिलभारतीय स्वरूपाच्या परिषदा ज्या उद्देशानें भरविण्यांत येत असतात ते किती सफल झाले हेंहि पाहणें आवश्यक असतें; या दृष्टीनें या अधिवेशनामध्यें जीं महत्त्वाचीं भाषणें व परिसंवाद झाले त्यांचा परिचयपरामर्श करून देण्याचें प्रस्तुत स्थळीं योजिलें आहे.

तत्त्वज्ञान-सभेचीं अधिवेशनें सालोसाल भरविण्यामध्यें अनेक हेतु असतात; जगामध्यें जीं अनेक सामाजिक-राजकीय आंदोलनें नित्य घडत असतात, त्यांमधून सूचित होणाऱ्या तात्त्विक प्रश्नांचा परामर्श घेणें हाहि एक प्रधान उद्देश असला पाहिजे; किंबहुना तत्त्वज्ञानाचें तें एक आवश्यक कार्य आहे. गेल्या अर्ध-शतकामध्यें, विचारवंतांच्या विचारशक्तीला चालना देऊं शकतील अशीं अनेक ऐतिहासिक स्थित्यंतरें व घडामोडी घडून आल्या आहेत. दोन महायुद्धांमध्यें युरोपीय राष्ट्रांतील मानवसमाजाची अक्षरशः होळी झालेली आहे; व जगांतील भारतासुद्धां इतर बहुतेक सर्व देशांनाहि त्याची चांगलीच झळ लागली आहे. राष्ट्राराष्ट्रांतील भयंकर स्वार्थी राजकीय स्पर्धा व त्या स्पर्धेला आधुनिक वैज्ञानिक शोधांमुळें आलेलें महाभयंकर स्वरूप, त्यांमधून डोकावणारी तिसऱ्या महायुद्धाची भीषण छाया, या सर्वांमुळें मानवी मनावर आलेलें नैराश्याचें घनदाट पटल, या घटनांची दखल वास्तविक तत्त्वचिकित्सकांनीं घेतली पाहिजे. अशा जागतिक आंदोलनें निर्माण करणाऱ्या घटनांचीं राजकीय व ऐतिहासिक कारणें कांहींहि असलीं तरी त्यांमागील मानसिक व वैचारिक भूमिका समजून घेऊन त्या कारणांचा निरास करावयाचा प्रयत्न आपल्या दृष्टीनें करणें हें तत्त्वचिकित्सकांचेंहि कर्तव्यच होय.

तत्त्वज्ञान-परिषदेनें या दृष्टीनें विचार करावा असें स्वागताध्यक्ष डॉ. जयकर, परिषदेचे उद्‌घाटक ना. न. वि. गाडगीळ इत्यादि अनेकांनीं सूचित केलें. प्रभावी तत्त्वविचार इतिहासाचें वळण कसें बदलूं शकतात व समाजाचा उद्धार कसा करूं शकतात याचें प्रात्यक्षिकच महात्मा गांधींनीं आपल्या जीवितकार्यानें दर्शविलें आहे; अशा प्रभावी विचारांची निर्मिति करून अखिल मानवजातीचें नैराश्य नष्ट करणें व जगांत शान्तता व स्थैर्य निर्माण करावयाचा प्रयत्न करणें हें तत्त्वचिकित्सकांचेंहि काम आहे असें ना. न. वि. गाडगीळ यांनीं आग्रहानें सांगितलें.

परिषदेचे प्राध्यक्ष प्रा. अनुकूलचंद्र मुकर्जी यांनीं आपल्या भाषणांत ‘ मानवी व्यक्तिमत्त्व ’ ( Human Personality ) याचें तात्त्विक विवेचन केलें त्याचा आशय असा :

प्रयोगद्वारा सृष्ट घटनांचें वास्तव निरीक्षण घडल्यानें शास्त्रीय चिकित्साबुद्धीचें समाधान होतें.








परंतु तत्त्ववेत्त्याचें समाधान एवढ्यानें होऊं शकत नाहीं. शास्त्रज्ञांनीं प्रायोगिक चिकित्सापद्धतीनें जे शास्त्रसिद्धान्त मांडलेले असतात, त्यांची सत्यान्वेषी दृष्टीनें मौलिक व अधिक छाननी करणें तत्त्ववेत्त्याला आवश्यक वाटतें. विश्वसत्तेचें स्वरूप जाणण्यासाठीं सर्व विशिष्ट शास्त्रसिद्धान्तांचें तौलनिक मूल्यमापन करणें आवश्यक असतें. सर्व सुट्या व फुटकळ सिद्धान्तांची संगति लावणें म्हणजेच त्यांचें ' शास्त्र ' बनविणें होय व सर्व शास्त्रांचे मूल-सिद्धान्त एका तर्कशुद्ध विचारमालिकेमध्यें गोंवणें म्हणजेच तत्त्वज्ञान होय. अर्थात् सर्व शास्त्रांचे मूल-सिद्धान्त समन्वित करणें, त्यांना एकाच विश्वकल्पनेच्या चौकटींत बसविणें हें काम निरीक्षणप्रयोगादि शास्त्रीय चिकित्सापद्धतीचें नव्हे; तें तत्त्वस्पर्शी तर्कशुद्ध विवेचक बुद्धीचेंच कार्य आहे.

विश्वाचीं अंतिम सत्यें ( Foundational transcendental principles ) व दुय्यम दर्जाचे शास्त्रसिद्धान्त या दोहोंमधील हा महत्त्वाचा फरक न ओळखण्यानें विचारांत उत्पन्न होणारा गोंधळ प्रसिद्ध इंग्लिश तत्त्ववेत्ता जॉन लॉक याच्या उदाहरणावरून सहज दिसून येईल. ' Essay concerning Human Understanding ' या त्याच्या ज्ञानमीमांसाविषयक तात्त्विक ग्रंथामध्यें मानसशास्त्रीय भूमिकेवरून त्यानें मानवी ज्ञानाची उत्पत्ति, मीमांसा व मर्यादा यांसंबंधीं निरूपण केलें आहे. शास्त्रीय निरीक्षण पद्धतीनें मानवी मनाचें अंतःशोधन करून विचारांची उत्पत्ति कशी होते हें समजलें असतां, त्याच्या आधारें संपूर्ण ज्ञानमीमांसाहि करतां येईल व मानवी ज्ञानाच्या अंतिम मर्यादाहि कळून येतील अशी त्याची समजूत असल्यामुळें, मानवी ज्ञानाचें आनुभविक मूलस्थान शोधून त्यावरून मानवी ज्ञानाचें अंतिम व तात्त्विक मूल्यमापन करावयाचा प्रयत्न लॉकनें केलेला आहे. वर निर्दिष्ट केलेल्या कारणामुळेंच लॉकचा प्रयत्न पूर्णपणें अयशस्वी ठरलेला आहे; एवढेंच नव्हे तर, लॉकनें केलेल्या या चुकीमुळें तर्क-दुष्ट विचारांची एक परंपराच पाश्चात्य तत्त्वज्ञान्यांत निर्माण झालेली दिसून येत आहे. उदाहरणार्थ, ' कार्यकारणभाव ' ( Causality ) या कल्पनेची तात्त्विक मीमांसा त्यानें मानसशास्त्रीय भूमिकेवरून केली आहे आणि तिचें आनुभविक मूळ शोधण्याचा निष्फळ प्रयत्न केला आहे. कान्टनें पुढें दाखविल्याप्रमाणें वास्तविक ' कार्यकारण-कल्पना ' ही एक मौलिक ज्ञानकल्पना आहे. मानवाच्या विविध अनुभवांतून सुचणारी किंवा निर्माण झालेली ती नाहीं. तिच्या आधारानेंच विविध निसर्गघटनांची संगति लावतां येते. म्हणून शास्त्रीय भूमिकेवरून या मौलिक कल्पनेची मीमांसा करण्याचा लॉकचा प्रयत्न याप्रमाणें मुळांतच तर्कदुष्ट ठरलेला आहे. कार्यकारणकल्पना मानवी मनामध्यें उत्पन्न कशी झाली असावी ? हा प्रश्न उत्पन्न करतांना तीच कल्पना आपण गृहीत धरली आहे हें त्याच्या लक्षांत आलें नाहीं. असो. कान्ट यानें या मानसशास्त्रीय ज्ञानमीमांसापद्धतीवर मर्माघात करून सिद्ध केलें कीं, मानवी ज्ञानव्यवहार कांहीं मौलिक कल्पनांच्या आधारेंच सिद्ध होऊं शकतो. अशा कल्पनांची शास्त्रीय चिकित्सा शास्त्रीय ज्ञानाच्या कक्षेतच येऊं शकत नाहीं. अशा कल्पना मौलिक अतएव गृहीतकृत्यस्वरूपच मानल्या पाहिजेत. असें म्हणण्यामध्यें आधुनिक शास्त्रीय ज्ञानाचा किंवा पद्धतीचा अधिक्षेप करावयाचा हेतु नसून केवळ त्याचें मर्यादित स्वरूप दिग्दर्शित करावयाचाच हेतु असतो.

वरील विचारसरणी, आधुनिक मानसशास्त्रानें प्रयोग-निरीक्षणपद्धतीच्या आधारें मानवी-व्यक्तिमत्त्वा ( Human Personality ) ची जी चिकित्सा केलेली आहे, तिला लावतां येणें शक्य आहे. या शास्त्रीय चिकित्सापद्धतीनें मानवी गुण-धर्मादिकांचें कांहीं प्रमाणांत मापन व विवरण करतां येईल; वर्तनाची हेतुसंगति लावतां येईल. तथापि, मानवी व्यक्तिमत्त्वाचा संपूर्ण उलगडा व विश्वांतील तिचें स्थान यांसंबंधीं संपूर्णतया ज्ञान होणें केवळ अशक्यच होय ! मानवी मनाचीं कित्येक खोल दालनें हीं प्रायोगिक पद्धतीच्या कक्षेमध्यें येऊंच शकत नाहींत. असें असतांना केवळ निरीक्षण-प्रयोगपद्धतिद्वारां मानवी विभूतिमत्त्वासंबंधीं जेवढें ज्ञान उपलब्ध होतें तेवढेंच तत्संबंधींचें संपूर्ण

सत्य होय असें सूचित करणें हें हेत्वाभासात्मक आहे. कोणतेंहि मौलिक तत्त्व हें शास्त्रीय सिद्धान्ताच्याच योग्यतेचें आहे असें मानणें, त्या दोहोंमधला तात्त्विक फरक न जाणणें हा मोठाच तर्कदोष होय. याला Fallacy of transcendental dislocation असें नांव देणें योग्य होईल.

एफ्. एच. ब्रॅड्ले हा सुप्रसिद्ध इंग्लिश तत्त्ववेत्ताहि या दोषापासून सर्वस्वीं अलिप्त नाहीं. ब्रॅडलेचें तत्त्वज्ञान त्याच्या तर्ककर्कश प्रतिभेचा एक सुंदर विलास आहे हें खरें. ' विसंगतीचा अभाव ' या तर्ककसोटीनेंच त्यानें सर्व चराचर विश्वांतील अनुभवांचें परीक्षण केलें. " सद्वस्तूचा शोध करतांना बौद्धिक सुसंगति डावलणें म्हणजे तर्काशीं काडीमोड करणें होय " असें आग्रहपूर्वक प्रतिपादन करणारा ब्रॅड्लेदेखील आपली मूळची भूमिका विसरून शेवटीं तर्कज्ञान व सद्वस्तु यांमध्यें फरक करूं लागला; "सद्वस्तु म्हणजे कांहीं केवळ बौद्धिक सुसंगतीची कसरत नव्हे " असें म्हणूं लागला. " जें कोडें बुद्धीनें सुटत नाहीं तें श्रद्धेनेंच सोडविणें इष्ट " असें शेवटीं त्यानें म्हटलें आहे. या ठिकाणीं वर निर्दिष्ट केलेल्या तर्कदोषास ब्रॅड्ले बळी पडला आहे असें म्हणणें भाग पडतें. तर्काच्या स्वयंसिद्धतेकडे त्यानें दुर्लक्ष केलें आणि चिकित्सक तर्कबुद्धीच्या आधारें अंतिम विश्वसत्तेच्या स्वरूपाचें आकलन व विवरण करण्याचा स्वतःचा भव्य प्रयत्न त्यानें अगदीं ऐन मोक्याच्या वेळींच हताशपणें सोडून दिल्यासारखें वाटतें.

सारांश, ज्याला ज्ञान होतें तो ज्ञाता हा स्वतः ज्ञानचिकित्सेचा विषय होऊं शकत नाहीं. ज्ञानव्यापारांचें मौलिक आश्रयस्थान किंवा अंतिम गृहीतकृत्य म्हणूनच त्याला मानणें तर्कदृष्ट्या अवश्य आहे. ज्ञानविषयांची चिकित्सा व उपपत्ति ज्या शास्त्रीय कसोटीनें व पद्धतीनें लाविली जाते तीच कसोटी व पद्धति ज्ञात्यालाहि लावण्याचा प्रयत्न करणें हा तत्त्वदृष्ट्या विफल प्रयत्न होय असेंच मानलें पाहिजे.

या तात्त्विक भूमिकेवरून मानवी विभूतिमत्त्वाचा विचार केला गेला पाहिजे. असा विचार केल्यास सहजच दिसून येण्यासारखें आहे कीं, ज्यामुळें निरीक्षणप्रयोगादि शास्त्रीय पद्धतीनें निष्पन्न होणारे त्रुटित स्फुट सिद्धान्त एकाच विचारसूत्रांत गोंविले जाऊन त्यांचें एक सुसंगत व स्वयंपूर्ण ' शास्त्र ' बनतें व अनेक शास्त्रांच्या मौलिक विचारांचेंहि सूत्रीकरण होऊन अखिल विश्वसत्तेचें एक 'तत्त्वज्ञान' बनूं शकतें. असें कांहीं तरी सूत्रीकरणाचें तत्त्व मानवी व्यक्तिमत्त्वामध्यें आहे असें मानणें तर्कदृष्ट्या टाळतां येण्यासारखें नाहीं. भूत, वर्तमान व भविष्यांतील नानाविध घटना एकाच विचारसूत्रांत गोंविणें हें एरवीं अशक्यच होय. यासाठीं मानवी विभूतीमध्यें केवळ निरीक्षणप्रयोगादि-चिकित्सेनें दिसून येतें त्यापेक्षां अधिक कांहीं शाश्वत तत्त्व आहे हें मान्य करावें लागतें. यालाच भारतीय तत्त्वज्ञानानें ' आत्मतत्त्व ' ही संज्ञा दिली आहे.

परिषदेच्या ' सामाजिक तत्त्वज्ञान '-शाखेचे अध्यक्ष प्राचार्य शं. वा. दांडेकर यांनीं आपल्या भाषणांत प्रथम आजच्या कांहीं महत्त्वाच्या जागतिक, सामाजिक, राजकीय प्रश्नांचा उल्लेख केला : सर्व जगाच्याच सामाजिक, नैतिक व धार्मिक परिस्थितीला हादरे बसले आहेत व सर्व मानवी मूल्यें कोलमडून पडत चाललेलीं दिसत आहेत. या सर्व अनर्थाचें मूळ आर्थिक आहे असें कांहींजण म्हणत आहेत. पण खरोखरीं हा मूलतः एक नैतिक व धार्मिक अनर्थ होय. या अनर्थामधून मार्ग काढण्याच्या कामीं आपल्या प्राचीन धर्माचार्यांचे विचार उपयोगी पडतील असा विश्वास प्रा. दांडेकर यांनीं व्यक्त केला.

समाजाची धारणा ज्यानें होते तो धर्म. या दृष्टीनें राज्यशास्त्र, नीतिशास्त्र हीं धर्मशास्त्राचींच अंगें होत. " धारणाद्धर्म इत्याहुः धर्मो धारयते प्रजाः । यः स्याद्धारणसंयुक्तः स धर्म इति निश्चयः ॥ " याप्रमाणें धर्माची व्याख्या केलेली आहे. याप्रमाणें धर्म व्यक्ति व समाज यांच्या सुस्थितीचें शास्त्र होय; निव्वळ पाश्चात्यांच्या अर्थानें ' नीतिशास्त्र ' नव्हे.

हिंदुधर्मशास्त्राचीं कांहीं ठळक तत्त्वें अशीं सांगतां येतील : परमेश्वर एकच आहे. परंतु परमेश्वरस्वरूपाचा विविध रूपांनीं आविष्कार होत असतो. तो विश्व व्यापून उरला आहे. मानव हा मूलतः परमेश्वरस्वरूपच असल्यामुळें शेवटीं मानवाचें ध्येय आत्मस्वरूपाची ओळख पटवून घेणें व त्याच्याशीं








तादात्म्य पावणें हेंच आहे. यासाठीं चित्तशुद्धीची आवश्यकता आहे. त्याचप्रमाणें प्रत्येकानें आपलीं प्राप्त कर्तव्यें निरहंकारित्वानें व समबुद्धीनें करीत राहणें हाच मार्ग आहे. मानवाची पारमार्थिक प्रगति याप्रमाणें त्याच्या कर्मावर अवलंबून असते. स्थित-प्रज्ञानेंहि लोककल्याणार्थ कर्म करीत राहिलें पाहिजे; कारण कर्म कोणालाहि सुटत नाहीं. श्रीज्ञानेश्वरांच्या दृष्टान्तानें असें सांगतां येईल कीं, ज्या डोळस माणसा-कडे आंधळ्यांच्या मालिकेचें पुढारीपण असतें, त्यानें त्या सर्व अंधांना झेपेल एवढ्याच वेगानें चाललें पाहिजे व सर्व अंधांना सुखरूपपणें इष्ट त्या ठिकाणीं नेऊन पोंचविलें पाहिजे. ही त्याची विशेष जबाबदारी असते. त्याचप्रमाणें स्थितप्रज्ञानेंहि देहत्याग करी-पर्यंत लोककल्याणार्थ कर्मे करीत राहिलें पाहिजे. याशिवाय ब्राह्मणक्षत्रियादि चार वर्ण, ब्रह्मचर्याश्रम-गृहस्थाश्रमादि चार आश्रम व देवऋण-ऋषिऋणादि चार ऋणें याहि हिंदुधर्मशास्त्राच्या महत्त्वाच्या कल्पना होत.

आधुनिक जगापुढें अनेक बिकट प्रश्न आहेत. त्यांपैकीं सर्वांत बिकट व महत्त्वाचा प्रश्न ' विषमते 'चा आहे. समता—सर्वांना समान लेखणें व सर्वांना समान संधि देणें—हें आधुनिक लोकशाहीचें आद्यतत्त्व आहे. सर्वांचे हक्क सारखे खरे; पण जगांत सर्वत्र विषमता दिसून येतेच. आधुनिक समाजवाद्यांच्या विचारसरणीप्रमाणें संपत्तीची विषम विभागणी हेंच सर्व विषमतेचें मूळ कारण होय. तेव्हां धनिकांची संपत्ति हिरावून घेऊन तिची सर्व जनतेमध्यें समान वांटणी करणें हाच त्यांच्या मतें समताप्रस्थापनेचा योग्य मार्ग होय. आमच्या प्राचीन धर्माचार्यांनीं संपत्तीचें महत्त्व जाणलें होतें; परंतु संपत्तीची सर्व लोकांत सम विभागणी करून विषमतेचा प्रश्न समूळ सुटेल असें त्यांनीं कधींच मानलें नाहीं. हा केवळ वरवरचा व तात्पुरता म्हणून टाकाऊ उपाय होय. चिरस्थायी समता निर्माण होण्याकरितां सर्वांच्या अंतःकरणांतच समतावृत्ति निर्माण झाली पाहिजे; केवळ समतेच्या बाह्य देखाव्यानें कांहींच होऊं शकणार नाहीं, असा त्यांचा अभिप्राय होता. उलट बाह्यतः विषमता असूनसुद्धां जर खरोखर अंतःकरणांत समतावृत्ति जागृत असेल तर समाज स्थिर व सुखी राहूं शकेल असेंच त्यांना वाटत होतें. ' समतेचा प्रश्न ' हा मूलतः आर्थिक प्रश्न नसून नैतिक व धार्मिक प्रश्न आहे असाच त्यांचा अभिप्राय होता.

समतेचें ध्येय राजकीय दण्डनीतीनें प्रत्यक्षांत आणतां येणें अशक्य होय. केवळ दण्डभयानेंच विषमतेचें उच्चाटण होईल अशी समजूत चुकीची होय. कायदे कितीहि कसोशीनें केले तरी कायद्यांचें यथायोग्य पालन करण्याची वृत्ति जोंपर्यंत जनतेमध्यें मुरली नाहीं, तोंपर्यंत कायद्यांचा बोज राखला जात नाहीं. अंतःकरणामध्यें सर्वांविषयीं समत्वबुद्धि ठेवणें हाच विषमताविनाशाचा उत्तम उपाय होय. यासाठीं नैतिक व धार्मिक शिक्षणच हवें; केवळ बाह्योपचारांनीं खरी जागतिक समता कधींहि निर्माण व्हावयाची नाहीं. या समतावृत्तीच्या योगानें मोठे आंतरराष्ट्रीय प्रश्नहि सोडविले जाणें अशक्य होणार नाहीं.

त्याचप्रमाणें प्रा. दांडेकरांनीं आपल्या भाषणा-मध्यें अहिंसा व वैराग्य यांचेंहि हिंदुधर्म-शास्त्राच्या दृष्टीनें निरूपण केलें. ' अहिंसा ' म्हणजे केवळ जीवांची हत्या न करणें नव्हे. उलट कांहीं वेळां दुष्टांची हत्या करून सामान्य जनांना अभयदान करणें अवश्यच असतें. अशा वेळीं केलेली हत्या ही हत्याच नव्हे. ज्ञानेश्वरांनीं म्हटल्याप्रमाणें काया-वाचामनेंकरून जगाच्या कल्याणासाठीं झटणें हीच खरी अहिंसावृत्ति होय. त्याचप्रमाणें भगवीं वस्त्रें परिधान करणें म्हणजे वैराग्य नव्हे. जीवित हें क्षण-भंगुर आहे, म्हणून जीवितनाश करणें हें वैराग्य हिंदुधर्मशास्त्रास असंमत आहे. उलट, जीवित नाश-वंत आहे म्हणूनच प्रतिक्षणीं आपलें विहित कर्तव्य करीत राहणें, हाच खरा वैराग्यप्रकार होय. मानवानें आपले व्यवहार अलिप्त वृत्तीनें करीत राहणें यांतच खरी वैराग्यशीलता आहे. कर्मामध्येंहि अकर्म पाहणें हेंच वैराग्य होय. जीवन ही एक प्रकारची क्रीडा होय व त्यांत प्रत्येकानें आपला भाग पार पाडला पाहिजे, असें जें एकनाथांनीं म्हटलें आहे त्यांतील मर्म हेंच होय. अशाच प्रकारची विचार-सरणी सर्व महाराष्ट्रीय संत कवींनीं व्यक्त केलेली आढळते.








'तत्त्वज्ञानाचा इतिहास' या विभागाचे अध्यक्ष प्रा. रामानुजाचारी (अन्नमलाई विद्यापीठ) यांनीं आपल्या भाषणांत तत्त्वज्ञानाचा हेतु तत्त्वजिज्ञासापूर्ति व जीवितसाफल्य असा दुहेरी असतो, असें प्रतिपादन केलें. मानवाचें स्वतःचें जीवन, त्याच्या भोंवतालचें नानाविध भौतिक विश्व व त्यामागील सत्यवस्तु यांचें खरें स्वरूप जाणावें आणि त्यायोगें आपलें जीवितसाफल्य साधावें, असा तत्त्वचिकित्सकांचा प्रधान हेतु असतो. तत्त्वचिकित्सकांचे जसे बरेवाईट नानाविध अनुभव त्यांच्या प्रतितीस येतात त्याप्रमाणें निरनिराळीं तत्त्वज्ञानें निर्माण होत असतात. तथापि, तत्त्वदर्शनें जरी वेगळीं असलीं तरी सर्वांचा हेतु विश्वप्रपंचाचें सम्यक् ज्ञान करून घेणें व मानवी जीविताचें वैभव, वैपुल्य व वैविध्य वाढविणें हाच असतो.

तत्त्वज्ञान व जीवित यांचा फार निकटचा संबंध असतो. अनिष्ट तत्त्वज्ञानानें नीतिबंधनें सुटतात व मानवाची आध्यात्मिक वाढ खुरटते; उच्च व उदात्त तत्त्वज्ञानाच्या योगानें मानवी जीवनाची नैतिक पातळी उंचावते व जीवन प्रकाशमय होत असतें.

तत्त्वज्ञानाचा इतिहास म्हणजे अनेक तत्त्वदर्शनांची खिचडी नव्हे; तर जीविताचें व अखिलविश्वाचें रहस्य समजून घेणाऱ्या मानवी प्रयत्नांचा इतिहास होय. तात्त्विक कल्पनांचा विकास कसा होत जातो हें तत्त्वज्ञानाच्या इतिहासावरून दिसून येत असतें. याचें उत्तम उदाहरण 'ज्ञान' या कल्पनेच्या विकासावरून दिसून येईल. ज्ञान हें मोक्षाचें साधन आहे असेंच सर्वत्र मानलें जातें. परंतु ज्ञानाचें स्वरूप काय? कांहींचें म्हणणें असें कीं, जीवात्मा व परमात्मा यांचें एकत्व जाणणें हेंच ज्ञान. इतरांच्या मतें ज्ञान हा कांहीं बौद्धिक विलास नव्हे; तर समत्वबुद्धीनें प्राप्त कर्माचरण करीत राहणें व चित्तशुद्धीनें परतत्त्वदर्शन प्राप्त करून घेणें म्हणजेच ज्ञान होय. याचप्रमाणें 'मोक्ष' व 'आनंद' याहि कल्पनांचा ऐतिहासिक विकास पाहणें मनोरंजक ठरतें.

'तर्कशास्त्र व अध्यात्मशास्त्र' या विभागाचे अध्यक्ष प्रा. कालिदास भट्टाचार्य (कलकत्ता) यांनीं आपल्या अध्यक्षीय भाषणाचा विषय 'तर्क व त्याचें प्रामाण्य' (Thought and its Validity) हा घेतला होता. आपणांस जेव्हां बाह्य वस्तुमात्रांचें ज्ञान होतें तेव्हां त्या ज्ञानप्रक्रियेचें कर्तृत्व आपणाकडेच असतें ही गोष्ट आपण अवश्य लक्षांत बाळगली पाहिजे. याचा अर्थ असा नव्हे कीं, ज्ञानसिद्धीच्या समयीं आपण हेतुपूर्वकच ज्ञाननिर्मिति करीत असतों किंवा तशा प्रकारची स्पष्ट जाणीव आपणांस असते. याचा अर्थ एवढाच कीं, ज्या विशिष्ट स्वरूपांत बाह्य जगताचें ज्ञान आपणांस होत असतें तें स्वरूप आपणच प्रायः दिलेलें असतें. कार्यकारणसंबंधदर्शक वगैरे जे विधानप्रकार असतात त्यांना कांहीं वास्तव आधार असतो हें खरेंच; तथापि विशिष्ट ज्ञानविषयांच्या बाबतींत आपली तर्कशक्तीच त्यांना हे संबंध लागू करीत असते. ज्ञानविषयांची ज्ञानपूर्व स्थिति अस्पष्ट अशीच असते. वस्तूंच्या बोध-(perception)प्रसंगीं त्यांना प्राप्त होणारा स्पष्ट आकार किंवा स्वरूप हें ज्ञात्याकडून मिळत असतें. या विशिष्ट स्वरूपास ज्ञानपूर्व अस्तित्व असत नाहीं; कारण ज्ञानाचें स्वरूप व ज्ञानविषय यांमध्यें मूलतः सामान्य असें कांहींच असूं शकत नाहीं. हीच गोष्ट तर्काचीहि आहे. जेव्हां कांहीं तर्कसिद्धि किंवा अनुमाननिष्पत्ति होते तेव्हां त्या विशिष्ट ज्ञानसिद्धीचें स्वरूप ज्ञात्याकडूनच मिळत असतें. तें मूळ वस्तुनिष्ठ असत नाहीं.

ज्ञाननिर्मिति ही याप्रमाणें वैयक्तिक घडणीची असते; तथापि, तर्कवृत्ति ही कांहीं एका अस्पष्ट अमूर्त अशा ज्ञानविषयाला उद्देशूनच होत असते. त्या दोहोंमध्यें अभिन्नत्व किंवा कांहीं सामान्य धर्महि नसतो. कारण जें अमूर्त व अस्पष्ट त्याच्याशीं समान काय असणार?

'अस्तित्ववाद (Existentialism) हें तत्त्वज्ञान आहे काय?' या विषयावर परिषदेमध्यें एक परिसंवाद ठेवण्यांत आला होता. परिसंवादामध्यें सागर विद्यापीठाचे प्रा. रासबिहारी दास, कलकत्याचे प्रा. अमियाकुमार मझुमदार, म्हैसूरचे प्रा. निकम यांनीं प्रामुख्यानें भाग घेतला होता.

डॉ. रासबिहारी दास यांच्या भाषणाचा मथितार्थ असा कीं, अस्तित्ववाद ही एक अतितार्किक विवेचक विचारसरणीविरुद्ध निर्माण झालेली

प्रतिक्रिया आहे. जीवन, मृत्यु, उत्कंठा, काळजी, घृणा या मानवी जीवनांतील महत्त्वाच्या व आनुभविक गोष्टी आहेत. त्यांचें अस्तित्व हेंच सत्य; कोणत्याहि तत्त्वज्ञानास त्यांना डावलून चालावयाचें नाहीं. यांनाच डावलून विवेचक तार्किक विचारसरणी जीवनाचें मूलतत्त्व (essence) शोधण्याचा व्यर्थ प्रयत्न करीत असते. याविरुद्ध अस्तित्ववादानें बंड उभारलें आहे. विचाराविरुद्ध भावना, जीवनस्वरूपा-(essence)विरुद्ध किंवा मूलतत्त्वशोधनप्रवृत्तीविरुद्ध जीवनाचें अस्तित्व असें या झगड्याचें स्वरूप आहे. कीर्केगार्ड, हायडेगर, यॉस्पर्स यांनीं अस्तित्ववादाच्या वेगवेगळ्या अंगांचें विवरण केलें आहे. पण त्या सर्वांचें सूत्र एकच आहे कीं मानवी जीवनाचें अस्तित्व, त्यांतील भावना, व्यथा, उपाधी, दुःखें, मृत्यू या सर्व गोष्टी सत्य, अनुभवसिद्ध आहेत; केवळ तर्काधिष्ठित तत्त्वज्ञान—उदाहरणार्थ हेगेलचें तत्त्वज्ञान—या सर्वांना आभास मानतें म्हणून तें तत्त्वज्ञान टाकाऊ होय. अशा प्रकारच्या अस्तित्ववादी विचारसरणीस 'तत्त्वज्ञान' हें नांव देतां येईल काय? एका दृष्टीनें नाहीं; कारण 'तत्त्वज्ञान' याचा अर्थ तर्कांच्या साहाय्यानें विश्वरचनेचें करून घेतलेलें ज्ञान असा असतो. त्या रूढ अर्थानें अर्थातच अस्तित्ववादाला 'तत्त्वज्ञान' म्हणतां यावयाचें नाहीं. तथापि सर्व प्रकारच्या गूढवादा-(mysticism)चा तत्त्वज्ञानामध्यें समावेश करण्याचीहि प्रथा आहे. ब्रॅड्ले, कान्ट वगैरे तत्त्ववेत्त्यांनींहि तार्किक विवेचक बुद्धीच्या मर्यादा मान्य केल्या आहेत; केवळ तर्कानें विश्वप्रपंचाचा उलगडा होऊं शकणार नाहीं असें म्हटलें आहे. असें असूनहि ब्रॅड्ले, कान्ट यांच्या विचारांना 'तत्त्वज्ञान' असें नांव कोणींहि नाकारलें नाहीं व नाकारणार नाहीं. याच न्यायानें 'तत्त्वज्ञान' याचा अगदीं संकुचित अर्थ घेऊन चालणें इष्ट नाहीं. अस्तित्ववाद वेगळ्या भूमिकेवरून का होईना, पण मानवी जीवनाची मौलिक भूमिका मांडतो आणि मानवी अनुभवांची तार्किक छाननी करतो, या कारणाकरितां अस्तित्ववाद हें तत्त्वज्ञान आहे असाच आपण निर्णय देणें आवश्यक आहे.

प्रा. अमियाकुमार मझुमदार यांनीं आपल्या भाषणामध्यें सांगितलें कीं, खरोखर अस्तित्ववाद हें तत्त्वज्ञान आहे ही गोष्ट मान्य करावयास हवीच. मानवी व्यक्तिमत्त्व व मानवी जीवन हीच कोणत्याहि तत्त्वज्ञानाची मध्यवर्ती कल्पना असली पाहिजे, असा रास्त आग्रह अस्तित्ववादी तत्त्ववेत्यांनीं धरलेला आहे. अस्तित्व, मूलस्वरूप, मानवी विभूतिमत्त्व, भावना, मृत्यु, संदेह इत्यादि त्यांच्या महत्त्वाच्या कल्पना कोणालाहि समजण्यासारख्या आहेत. याकरितां अस्तित्ववादी विचारसरणी, हें थोड्या उदार दृष्टीनें विचार केल्यास 'तत्त्वज्ञान'च होय असें मान्य करणें जरूर आहे.

प्रा. निकम यांच्या मतें अस्तित्ववादाला जर तत्त्वज्ञान म्हणावयाचें झालें तर तें संकुचित अर्थानेंच म्हणावें लागेल. कारण विश्वसत्तेचा साकल्यानें केलेला विचार म्हणजेच तत्त्वज्ञान असें जर मानलें, तर अस्तित्ववादास तत्त्वज्ञान म्हणतां येणार नाहीं. अस्तित्ववाद हा फक्त एक विशिष्ट दृष्टिकोन आहे. आधुनिक यांत्रिक युगामध्यें मनुष्याच्या मानवतेचा संकोच होत चालला आहे; त्याविरुद्ध अस्तित्ववादाची प्रतिक्रिया उत्पन्न झाली आहे. अस्तित्ववादाचें एक मुख्य सूत्र 'आधीं अस्तित्व, नंतर मूलस्वरूप' असें आहे. एकादा कारागीर जेव्हां एकादी वस्तु तयार करतो तेव्हां त्या वस्तूचें 'स्वरूप' (essence) त्याच्यापुढें अगोदर असतें व तदनुरूप तो ती वस्तु घडवितो. अस्तित्ववाद्यांच्या मतानें, मानव मात्र 'स्वतःच स्वतःचा कारागीर असतो.' परंतु स्वतःचें कांहीं स्वरूप पुढें ठेवल्यावांचून स्वतःच स्वतःचा कारागीर मानव कसा बनूं शकेल? ज्ञानमीमांसेच्या दृष्टीनें 'स्वरूप आधीं व नंतर अस्तित्व' असेंच मान्य करणें भाग पडतें. अस्तित्ववाद्यांचा आणखी एक सिद्धांत असा आहे कीं, विश्वसत्तेचें स्वरूप आपल्याला केवळ इंद्रियद्वारें किंवा तर्कद्वारें समजून येत नसून, तें एकाद्या आपत्काल-(crisis)-प्रसंगींच मानवाला प्रतीत होऊं शकतें. आपत्काल म्हणजे ज्या परिस्थितीमध्यें मनुष्यापुढें कांहीं विकल्प उत्पन्न होतात व त्यांमधून कांहीं तरी स्पष्ट निर्णय घेऊन त्याप्रमाणें प्रत्यक्ष वर्तन करण्याची जबाबदारी पडते, ती परिस्थिति. एकूण, अस्तित्ववादाप्रमाणें व्यक्तीच्या अस्तित्वाचें प्रमाण








किंवा पुरावा त्याच्या कर्मामध्येंच सांपडूं शकतो. अशा वेळीं निर्णयाचा धोका व जबाबदारी पत्करतांना 'व्याकुळता' व 'भय' निर्माण होत असतें. अशा वेळीं व्यक्तीची तर्कबुद्धि किंवा विवेक उपयोगी पडत नाहींत; तर भावना व आंतरिक संवेदनाच उपयोगी ठरतात. "अशा वेळीं ज्या दिशेनें माझी भावना मला खेंचते त्याच दिशेनें मी जाणें हेंच योग्य ठरत असतें." प्रा. निकम यांच्या मतें अस्तित्ववादाला संपूर्णार्थानें तत्त्वज्ञान म्हणतां यावयाचें नाहीं. तो फक्त एक विशिष्ट दृष्टिकोन आहे. व या संकुचित अर्थानें त्यास वाटल्यास 'तत्त्वज्ञान' ही संज्ञा देण्यास हरकत नाहीं.

"ईश्वरावांचून धर्म शक्य आहे काय?" या विषयावरील परिसंवादामध्यें जयपुरचे प्रा. सिंग, रांचीचे प्रा. जमुनाप्रसाद व धारवाडचे प्रा. कुलकर्णी यांनीं भाग घेतला. प्रा. सिंग यांनीं परमेश्वराशिवाय धर्म संभवत नाहीं अशी भूमिका मांडली. धर्मभावनेचें विश्लेषण केल्यास तीमध्यें ईश्वराची कल्पना म्हणजे विश्वाच्या अंतिम सत्तेचें अधिष्ठान मानलेली दिसून येत असते. तसेंच कांहीं तरी जीवितसाफल्याची—नैतिक व इतर मूल्यांची—कल्पनाहि दिसून येत असते. धर्मामध्यें ज्या प्रमाणांत या कल्पनेवर भर देण्यांत आलेला असतो, त्या प्रमाणांत त्या धर्माची 'धार्मिकता' ठरत असते. या दृष्टीनें पाहिल्यास बौद्ध व जैन हे धर्म 'धर्मा'च्या कसोटीस उतरतात. नैतिक ध्येयाची स्पष्ट कल्पना त्यांमध्यें आहे.

आधुनिक विचारवंतांमध्यें ज्यूलियन हक्स्ले हा परमेश्वरविरहित धर्माची शक्यता मानतो. धर्मप्रवृत्तीमध्यें अंतिम विश्वसत्तेचा विचार समाविष्ट असत नाहीं, असें तो म्हणतो; आणि धर्माचें कार्य फक्त मानवी अंतःकरणांतील शुद्ध सात्त्विक प्रवृत्तींची जुळणी करणें एवढेंच आहे असें तो मानतो. पण याचा अर्थ इतकाच कीं, मानवच ईश्वरस्वरूप आहे असें हक्स्ले मानतो.

प्रा. जमुनाप्रसाद यांच्या म्हणण्याप्रमाणें मूल्य-कल्पनेपेक्षांहि ईश्वरकल्पना धर्मास अधिक आवश्यक आहे. कारण धर्मभावनेमध्यें प्रार्थना, पूजा, परमेश्वराच्या दयाळूपणाविषयीं अपरंपार श्रद्धा आणि परमेश्वरकृपेनें मोक्षप्राप्तीची शक्यता यांवर विश्वास—याच गोष्टींचा प्राधान्यानें अंतर्भाव होत असतो. चराचर विश्व व मानवी जीवन ज्या ईश्वरी सत्तेच्या संकेतानुसारच चालत असतात, त्या सत्तेची पूजा, प्रार्थना व कृपायाचना करणें हें कोणत्याहि धर्माचें आवश्यक लक्षण होय. या दृष्टीनें बौद्धधर्म व जैनधर्म यांना 'धर्म' ही संज्ञा देतां येणार नाहीं.

प्रा. कुलकर्णी यांचें मत असें कीं, रूढार्थानें परमेश्वरावांचून धर्म संभवत नाहीं, परंतु तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें धर्माची व्याख्या केल्यास परमेश्वराशिवायहि धर्माचें अस्तित्व संभवूं शकेल.

याप्रमाणें या अधिवेशनामध्यें अनेक नामवंत विद्वानांचीं व्यासंगपूर्ण व्याख्यानें झालीं. याशिवाय निरनिराळ्या विषयांवर निबंधवाचनहि बऱ्याच विद्वानांनीं केलें.

असें जरी असलें, तरी प्रारंभीं लिहिल्याप्रमाणें परिषदेंतील भाषणांमधून प्रस्तुत देशकालपरिस्थितीबाबतची जाणीव जिव्हाळ्यानें प्रकट केली गेली असें वाटत नाहीं. फक्त प्रा. दांडेकरांचेंच भाषण याला अपवादात्मक आहे असें वाटतें. प्रचलित जागतिक परिस्थितीनें उत्पन्न केलेले प्रश्न व तत्संबंधीं प्राचीन धर्माचार्यांचे प्रस्तुत कालींहि उपयुक्त वाटणारे विचार त्यांनीं प्राधान्येंकरून मांडलेले आहेत.

वरील भाषणांशिवाय आणखी एक विशेष परिसंवाद कार्यक्रमामध्यें ठेवण्यांत आला होता. परिसंवादाचा विषय "The Concept of Man and the Philosophy of Education" हा होता. जीं भाषणें प्रत्यक्ष झालीं त्यांमध्येंहि बहुधा मानवी व्यक्तिमत्त्वाचें आध्यात्मिक स्वरूप यावरच निरूपणें निरनिराळ्या वक्त्यांनीं केलीं. त्यांचा सारांश बहुधा 'तत्त्वमसि श्वेतकेतो!' एवढाच होता असें म्हटलें असतां चालेल. नवशिक्षणद्वारें मानवाचें स्वातंत्र्य व प्रतिष्ठा टिकविणें या व्यावहारिक प्रश्नांची चर्चा केवळ वेदान्ती पद्धतीनें या परिसंवादांतून करण्यांत आली असें वाटतें. सामाजिक शास्त्रें व इतिहास यांच्या तत्त्वज्ञानास सभेमध्यें अधिक महत्त्वाचें स्थान मिळणें इष्ट आहे, असा एक विचार या अधिवेशनाच्या अखेरीस कांहींच्या मनांमध्यें उत्पन्न झाला असणें असंभवनीय नाहीं.








## सार संकलन

### गुजरातचीं दोन रत्नें हरपलीं !

गतवर्षीं गुजरातमधून दोन महान् विभूती गेल्या— सरदार वल्लभभाई आणि ठक्कर बाप्पा. यंदां गुजरातचे दरबार गोपाळदास आणि प्रा. ब. क. ठाकोर हे दोघे गेले. दरबारसाहेबांच्या सेवामय व त्यागी जीवनकार्यामुळें गुजरात-सौराष्ट्राच्या माहात्म्यांत मोठी भर पडली आहे. प्रा. ब. क. ठाकोर तर गुजराती साहित्याचे भीष्मपितामहच होते !

दरबारसाहेबांच्याविषयीं श्री. किशोरलालभाईंनीं 'शिक्षण अने साहित्य' मासिकांत (जाने. अंकांत) थोडेंच पण वेंचक शब्दांत लिहिलें आहे तें पुढें दिलें आहे :

"तुरुंगांत मीं कित्येक दिवस दरबारसाहेबांबरोबर घालवले आहेत आणि बाहेरहि कित्येक वेळां त्यांना भेटलों आहे. त्यांना 'रास' नृत्यांत नाचतांना आणि हास्यविनोद करतांना पाहिलें आहे आणि गंभीरपणानें त्यांच्या हृदयींच्या गोष्टी ऐकल्या आहेत. त्यांनीं व त्यांच्या पत्नी भक्तिबा यांनीं केलेलें प्रेमपूर्ण आतिथ्यहि अनुभवलें आहे.

"गुजरात-सौराष्ट्रांतील जनतेला त्यांची ओळख करून द्यायचें कारणच नाहीं. ते सर्व ठिकाणीं हिंडले होते आणि मूळचे राजे असूनहि कित्येक वर्षांपासून जनतेसाठीं सामान्य प्रजाजन बनून गेले होते. राज्यांचें-संस्थानांचें कायदेशीर विसर्जन-विलीनीकरण होण्यापूर्वींच त्यांनीं आपलें राज्यपद सोडलें होतें. प्रजेचें राज्य प्रजेला देऊन टाकून जनतेचे ते सेवक बनले होते. पण असें केल्यामुळेंच तीन लहानलहान गांवांचे 'दरबार' (म्हणजे रजपूत संस्थानिक) न राहतां ते लाखों लोकांचे 'दरबार' बनले !

"दरबारसाहेबांबरोबर भक्तिबांचीहि आठवण येणें स्वाभाविक आहे. या पतिव्रतेनें दरबारसाहेबांना जो सहकार दिला, त्यांचें जीवन उन्नत करण्यांत जो भाग घेतला, तो सर्वांना परिचित आहेच. त्यांच्या स्वामिनारायणपंथी वडिलांनीं त्यांचें नांव 'भक्ति' बाई ठेवलें तें सार्थ ठरलें आहे. अशा साध्वीला पतीचें मरण विधवा करीत नसून अक्षरशः गंगाभागीरथीस्वरूप बनवितें, ती साध्वी विशेष पूजनीय व पवित्र होते."

कै. प्रा. ब. क. ठाकोर यांच्याविषयीं 'संस्कृती'चे संपादक उमाशंकर जोषी यांनीं लिहिलेलें स्फुट असेंच महत्त्वाचें आहे. 'संस्कृती'-च्या जानेवारीच्या अंकावरून तें येथें दिलें आहे :

"पंधरा वर्षांपूर्वीं एकदां गप्पागोष्टी चालल्या असतां 'चित्रगुप्ताच्या वहींतून माझें पानच नाहींसें झालेलें दिसतें !' असे उद्गार प्रा. ठाकोर यांच्या तोंडून निघाले होते. त्यांनीं आपल्या ८२ व्या वाढदिवशीं आपल्या 'जर्जरित देहाला' उद्देशून असें म्हटलें आहे : 'जरा उचल शीर्ष; दूर न अतां विसावा पाहा.' ('जरा उचल डोक; दुर नथि जो विसामो हवे'). ते शरीराकडून काम करून घेत, पण त्याची निगाहि चांगली ठेवीत. प्रा. ठाकोर हे गुजराती 'साक्षर'-किंवा-पंडितयुगांतील शेवटचे अवशेष होत. नर्मद-दलपतरामांपासून निरंजन भगत या तरुण लेखकापर्यंतच्या अनेक साहित्यिक पिढ्यांना सांधणारा दुवा आतां लुप्त झाला आहे. ६३ वर्षें त्यांची वाङ्मयसाधना अखंडपणें चालली होती. त्यांत त्यांना मुख्यतः कवि व काव्यशिक्षक म्हणून खास यश मिळालें. एक नवीन गद्यशैली निर्माण करणारे म्हणूनहि प्रा. ठाकोर यांनीं गुजराती साहित्यांत महत्त्वाचें स्थान प्राप्त करून घेतलें आहे. त्यांच्या साहित्यांत केवळ लेखनकौशल्याचा आविष्कार नसून व्यक्तित्वाचा उन्मेषहि आहे.

"प्रा. ठाकोर यांचें व्यक्तित्व ही एक परम-







लोभनीय गोष्ट होती. अचाट बुद्धि व शरीर यांमागें त्यांचें अत्यंत कोमल, वत्सल असें हृदय छपून राहत नसे. 'वल्लुकाका' हे नेहमीं प्रेमाला वश होत. हें आगळें व्यक्तित्व आतां त्यांच्या अक्षरदेहाच्या द्वारेंच अनुभवावयाचें."

प्रा. ब. क. ठाकोर हे सरकारी कॉलेजांत इतिहासादि विषयांचे प्राध्यापक असतां त्यांचें वास्तव्य महाराष्ट्रांतहि होतें. त्यामुळें त्या काळच्या महाराष्ट्राचें प्रत्यक्ष ज्ञान त्यांना होतें. ते गांधीजींबरोबर राजकोटला शिकले होते. त्यांचा गांधीजींशीं कित्येक बाबतींत तीव्र मतभेद होता व त्यांनीं तो स्पष्ट बोलूनहि दाखविला. पण 'मोहनभाई'-विषयींचें त्यांचें प्रेम मात्र अखंड राहिलें. गुजरातच्या या निःस्पृह, स्पष्टवक्त्या व तल्लख बुद्धीच्या साहित्यकार 'साक्षरा'चें स्मरण महाराष्ट्रानेंहि सतत ठेवण्यासारखें आहे.

## कोडाइकनालच्या वेधशाळेचा सुवर्णमहोत्सव

कोडाइकनाल येथील खगोल-भौतिकशास्त्राची वेधशाळा १९०१ सालीं व्यवस्थितपणें सुरू झाली. आतां तिला ५० वर्षें पुरी होऊन गेलीं आहेत. यूरोप-अमेरिकेंतील या तऱ्हेच्या वेधशाळांएवढीच जवळ जवळ ती जुनी आहे आणि तिचें कार्यहि खूप भरीव आहे. पुढील माहिती 'करन्ट सायन्स'च्या ऑक्टोबरच्या अंकांतून दिली आहे :

या वेधशाळेचा मुख्य निरीक्षणविषय म्हणजे सूर्यविषयक भौतिकशास्त्र होय. परंतु तिनें ग्रह, धूमकेतू आणि तारे यांबद्दलच्या अभ्यासांतहि बरीच भर घातली आहे. या कार्यामुळें आणि ७७०० फूट उंच ठिकाणची तिची जागा यामुळें, या वेधशाळेला सूर्यविषयक वेधशाळांत महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें आहे.

आंतरराष्ट्रीय खगोलशास्त्रमंडळाच्या विद्यमानें ही वेधशाळा पॅरिस, ग्रीनिच, माउन्ट विल्सन आणि केंब्रिज येथील वेधशाळांबरोबर सहकार्य करते. सूर्यावरील नवे नवे उत्क्षेप (prominences) आणि काळे डाग यांच्या जागतिक निरीक्षणाचा ताळा जुळवण्याचें मोठें कार्य हीच वेधशाळा करते.

या वेधशाळेचें नांव फार लवकर जगभर माहीत व्हावयास कारण झालेला नवा शोध म्हणजे सूर्यावरील डागांतील किरणोत्सारी गतिमत्ता-(radial motion)-विषयक होय. त्यानंतर शुक्र, Sirius आणि Nova-aquitae यांच्या किरणपटकां (spectra) विषयीं तेथें केलेलीं निरीक्षणेंहि त्या शाखेंतील अभिजात कार्य समजलें जातें. असें असलें तरी, नव्यानव्या साधनसामग्रीच्या दृष्टीनें ही वेधशाळा अद्ययावत् राहूं शकत नाहीं, ही खेदाची गोष्ट होय. म्हणूनच सर सी. व्ही. रामन् यांनीं खगोलविद्येसंबंधांत काढलेले पुढील उद्गार मननीय वाटतात : "खगोलशास्त्राचा अभ्यास कशाला करायचा असा प्रश्न विचारला जातो. पैसा कशाला व्यर्थ खर्चायचा असेंहि म्हटलें जातें. परंतु खगोलविद्या हा भारताचा परंपरागत सांस्कृतिक वारसा आहे. खगोलविद्या ही सर्वांत जुनी विद्या आहे एवढेंच नव्हे, तर ती सर्वांत भव्य अशी विद्या आहे. स्थूलपणें असें म्हणतां येईल कीं, खगोलविद्या म्हणजे भौतिक विश्वाचें स्वरूप समजावून देणारें शास्त्र आहे. या दृष्टीनें विज्ञानांत त्याला प्रमुख स्थान आहे. खरोखर ही ख-लोकांत उगम पावणारी ज्ञानगंगाच असून, ती पृथ्वीवर अवतीर्ण होऊन ज्ञानक्षेत्र व सांस्कृतिक क्षेत्र यांवर जलसिंचन करून त्यांना संजीवन देते."

## वाल्मीकि-रामायणाची संशुद्ध आवृत्ति

महाभारताच्या प्रचंड संशुद्ध आवृत्तीचें भगीरथ कार्य 'भांडारकर प्राच्यविद्यासंशोधनमंदिरा'नें अंगावर घेऊन त्यांतील बरेंचसें काम यशस्वीपणें पारहि पाडलें आहे. त्याला जगांतील तज्ज्ञ संशोधकांचा संपूर्ण सहकार मिळाला आहे. महाभारताप्रमाणेंच वाल्मीकीच्या रामायणाची अशीच संशुद्ध आवृत्ति निघावी, असें सर्वांनाच वाटत असणार. लाहोरच्या कांहीं मंडळींनीं फाळणीपूर्वी हें कार्य अंगावर घेतल्याचें घोषित केलें होतें. पण तें पुरें होण्याचा योग दूरच राहिला. पुण्यासारख्या विद्येच्या केंद्रांत कांहीं लोकांनीं निरनिराळ्या प्रती एकत्र करून रामायणाची अत्यंत विश्वसनीय संहिता तयार करण्याचें काम चालू केल्याचें कित्येकांना माहीत असेलच. परंतु या तऱ्हेचे प्रयत्न व्यक्तिगत न राहतां संस्थेच्याद्वारें करण्यांत, कार्य व सोय या दोन्ही दृष्टींनी










लाभच होतो. रामायणाची अशी एक संशुद्ध आवृत्ति काढावयाचें बडोद्याच्या सयाजीराव विद्यापीठानें अंगावर घेतलें असून, तें त्या विद्यापीठाच्या प्राच्यविद्यामंदिराकडे सोंपविलें आहे. या योजनेला लागणारा पैसा गुजरातेंत सहज जमा होऊं शकेल. पण या तऱ्हेच्या अवघड कार्यांची म.हिती असलेला कोणी एखादा मुख्य संपादक स्वतंत्रपणें नेमूनच हीं कार्यें होत असतात. महाभारतासाठीं डॉ. सुकठणकर लाभले आणि डॉ. बेलवलकरांनीं ती परंपरा पुढें टिकवून धरली. बडोदें विद्यापीठाच्या संशोधन-संस्थेच्या स्वतंत्र नियतकालिकाचा पहिला अंक नुकताच प्रसिद्ध झाला आहे. त्यांत जी माहिती दिलेली आहे तीवरून अशी कोणी स्वतंत्र मंडळी नेमल्याचें आढळत नाहीं.

सध्यां या संस्थेंत रामायणसंशोधनशाखा स्वतंत्रपणें सुरू झाली आहे. माहीत असलेल्या सर्व हस्तलिखित रामायणप्रतींची कार्ड-सूचि तयार करण्याचें काम चालूं आहे. हिंदुस्थानांतील निरनिराळ्या भागांत हिंडून तेथून रामायणाच्या हस्तलिखित प्रती जमविण्याचें काम चालूं असून, एकट्या मलबारांतच ३४ हस्तलिखितें उपलब्ध झालीं आहेत. काश्मीर, नेपाळ, इन्डोनेशिआ व जगांतील अन्य देश यांमधून हस्तलिखितें मिळविण्याचा प्रयत्न करण्यांत येणार आहेच. संस्थेच्या संचालकांची सर्वांना सहकार्याची विनंति आहे.

### पदार्थविज्ञान-रसायन-वैद्यकशास्त्रांतील नो बे ल पा रि तो षि कें

नोव्हेंबर-डिसेंबरच्या 'करंट सायन्स' वरून पुढील माहिती संगृहीत केली आहे :

१९५१ सालचीं नोबेल पारितोषिकें कांहीं महिन्यांपूर्वीं जाहीर झालीं. पदार्थविज्ञानशास्त्रांतील प्रावीण्याबद्दलचें पारितोषिक दोन ब्रिटिश शास्त्रज्ञांना मिळालें. सर जॉन कॉक्क्रॉफ्ट या हार्वेल येथील ब्रिटिश अणुसंशोधनकेंद्राच्या मुख्य संचालकांना आणि प्रो. ई. टी. एस्. वॉल्टन या डब्लिन युनिव्हर्सिटीच्या प्राध्यापकांना हा मान संयुक्तपणें मिळाला. 'नवभारता'च्या गेल्या अंकांत किमयेचें वर्णन करतांना रूदरफर्डचे 'आधुनिक किमया'-विषयक उद्गार दिले होते. ती आधुनिक किमया म्हणजेच मूलतत्त्वांचें परिवर्तन ( transmutation of elements ) साध्य करण्याच्या कामगिरीबद्दलच तें पारितोषिक या शास्त्रज्ञांना मुख्यतः देण्यांत आलें. या दोघांचें कार्य रूदरफर्डच्या दिग्दर्शनाखालीं १९३२ सालींच सुरू झालें. तेव्हां त्यांनीं लिथिअम् मूलतत्त्व छेदून त्यांतून दोन अल्फा किरण तयार केले. पुढें त्यांनीं इतर ज्ञात मूलतत्त्वांच्या परिवर्तनाप्रमाणेंच कित्येक अज्ञात मूलतत्त्वेंहि ( new elements ) शोधून काढलीं.

रसायनशास्त्रांतील पारितोषिकहि संयुक्तपणेंच देण्यांत आलें. प्रो. सीबोर्ग व प्रो. मॅक्मिलन् या कॅलिफोर्निया युनिव्हर्सिटीच्या प्राध्यापकांना तें मिळालें. वर ज्या नव्या मूलतत्त्वांचा उल्लेख आला आहे त्याच क्षेत्रांतील रासायनिक कार्याबद्दल हें पारितोषिक दिलें गेलें आहे. अजूनपर्यंत ९२ मूलतत्त्वें माहीत होतीं. या शास्त्रज्ञांनीं व त्यांच्या सहकाऱ्यांनीं ९३ वें नेप्च्युनिअम्, ९४ वें प्लुटोनिअम्, ९५ वें अमेरिकम्, ९६ वें क्यूरिअम् व ९७ वें बर्केलिअम् हीं नवीं मूलतत्त्वें सिद्ध करून, त्यांच्या रासायनिक गुणधर्मांबद्दलहि संशोधन केलें. हीं मूलतत्त्वें नैसर्गिक रीत्या उपलब्ध नसतात. कारण त्यांचा अर्धजीवनकाल ( किरणोत्सारी पदार्थांच्या विकलनाचें प्रमाण ) फारच सूक्ष्म असतो. या शास्त्रज्ञांनीं तीं मूलतत्त्वें अगदीं नवीन 'अल्ट्रा-मायक्रोकेमिकल' साधनांनीं सुटीं करून प्रथम दाखविलीं म्हणून त्या मूलतत्त्वांना Synthetic मूलतत्त्वें म्हणतात तें यथार्थ आहे.

वैद्यकशास्त्रांतील नोबेल पारितोषिक डॉ. मॅक्स थायलर (Theiler) यांना मिळालें. त्यांनीं 'यलो फीव्हर' नामक अत्यंत घातक रोगावर प्रतिबंधक औषध शोधून काढलें आहे. त्यांच्या संशोधनाचें वर्णन असें आहे : 'The discovery of the innocuous nature of 17 D sub-culture of the Asibi strain of Yellow Fever.' याच लसीचा उपयोग आतां यलो फीव्हरविरुद्ध प्रतिबंधक म्हणून फार मोठ्या प्रमाणांत होतो. डॉ. थायलर हे दक्षिण आफ्रिकन गृहस्थ आहेत. त्यांचा जन्म तेथें १८९९ सालीं झाला. शिक्षण मात्र इंग्लंडांत झालें व








संशोधन हार्वर्ड (अमेरिका) येथील उष्ण-कटिबंधीय वैद्यककेन्द्रांत झालें. शेवटीं रॉकफेलर संशोधनसंस्थेत त्यांनीं आपला वरील महत्त्वाचा शोध लावला.

**लिंकननें दाढी कां वाढवली ?**

अमेरिकेच्या इतिहासांतील प्रसिद्ध पुरुष अब्राहम लिंकन हे थोर मानवतावादी पुढारी होते. त्यांची दाढी वाढविलेलीं छायाचित्रेंच हल्लीं आपण पाहतों. ती दाढी त्यांनीं आपल्या कारकीर्दीच्या शेवटच्या चार वर्षांतच वाढविली. ती वाढविण्याविषयींची मनोरंजक हकीगत 'रीडर्स डायजेस्ट'च्या जानेवारी-च्या अंकांतील इर्था पॉली यांच्या संक्षेपित लेखावरून पुढें दिली आहे :

अब्राहम लिंकनविषयींच्या लठ्ठ ग्रंथांत ग्रेस बेडेल नांवाच्या ११ वर्षांच्या मुलीचा उल्लेख आढळणार नाहीं. पण लिंकन मात्र पुष्कळ वेळां या न्यूयॉर्क संस्थानांतील मुलीचा उल्लेख करीत. (लिंकनचें संस्थान इलिनॉय हें दक्षिण विभागांत आहे.)

ग्रेस बेडेलच्या वडिलांनीं तिला जत्रेहून एक लिंकनचा फोटो आणून दिला होता. तिनें पाहिलेला पहिलाच फोटो होता तो ! रात्रीं तेलाच्या मंद प्रकाशांत ती तो पाहत असतां रंगली. आणि लिंकनच्या खोल गेलेल्या गालांवर छायाप्रकाश नाचत असतां तिला वाटलें, 'लिंकनला दाढी उगवली आहे.—यांना दाढी किती छान दिसते !'. मग तिनें कागदशाई घेऊन पुढील पत्र लिहिलें :

"

वेस्टफील्ड्, (न्यूयॉर्क स्टेट)
१५ ऑक्टोबर १८६०

माननीय ए. बी. लिंकन,

प्रिय महाशय,

मी एक ११ वर्षांची लहान मुलगी आहे. पण माझी फार फार इच्छा आहे कीं, तुम्हीं युनायटेड स्टेट्स्चे अध्यक्ष व्हावें. तेव्हां एवढ्या मोठ्या माणसास मीं हें लिहिल्याबद्दल मला क्षमा करावी.

तुमच्याकडे माझ्याएवढ्या लहान मुली असल्या तर त्यांना माझे 'नमस्ते' सांगा आणि या पत्राचें उत्तरहि लिहावयास सांगा. मला चार भाऊ आहेत आणि त्यांतले कांहीं नक्कीच तुम्हांला मतें देतील; पण तुम्ही जर दाढी वाढविलीत तर तुम्हांला मत द्यायला बाकीच्यांचेंहि मन मी वळवीन. दाढी वाढवल्यानें तुम्ही कांहींसें बरें दिसूं लागाल. कारण तुमचा चेहरा अगदीं बारीक दिसतो. सगळ्या बायकांना दाढी ठेवलेले पुरुष आवडतात. तेव्हां सर्व बायका आपल्या नवऱ्यांच्या पाठीस लागून तुम्हांला मतें देववितील व मग तुम्ही राष्ट्राध्यक्ष व्हाल.

ग्रेस बेडेल "

या पत्राला उत्तर पाठवावें कीं नाहीं असा वाद लिंकनच्या खासगी चिटणीसांत चालला होता. तें बोलणें लिंकननें ऐकलें व पुढील पत्र उत्तरादाखल पाठविलें :

" खासगी

स्प्रिंगफील्ड, १९ ऑक्टो. १८६०

प्रिय छोटी ग्रेस,

तुझें पत्र मिळालें. मला तें फार फार आवडलें. मला मुली नाहींत हें लिहितांना फार वाईट वाटतें. मला तीन मुलगे आहेत. एक १७, एक ९ व एक ७ वर्षांचा. हीं मुलें व त्यांची आई एवढेंच माझें कुटुंब. आतां दाढीविषयीं म्हणशील तर मला अशी शंका येते कीं, मी ती आतां तुझ्या सांगण्यावरून वाढवूं लागलों तर लोक त्याला वेडपट प्रेमाचा प्रकार तर म्हणणार नाहींत ना ?

तुझा अगदीं मनापासून हितचिंतक,
ए. लिंकन "

निवडणुकीनंतर अध्यक्ष लिंकन आगगाडींतून वेस्टफील्डवरून जात असतां स्टेशनवर थांबले. समारंभ आटोपल्यावर त्यांनीं छोट्या ग्रेसची खास चौकशी केली आणि ती पुढें येतांच तिला कुरवाळून आपण तिच्या सांगण्यावरून कशी दाढी वाढविली आहे तें सांगितलें.

ग्रेसच्या जीवनांतला तो अविस्मरणीय क्षण होता !

**अमेरिकेंतील 'हौशी' चोर !**

अमेरिकेंत धंदेवाईक चोर किंवा दरोडेखोर करीत असलेल्या गुन्ह्यांच्या पांचपट गुन्हे 'हौशी' लफंगे करीत असतात. याबद्दलची माहिती व










कारणमीमांसा 'रीडर्स डायजेस्ट' (जाने. १९५२) मध्यें आलेली पुढें सारांशरूपानें दिली आहे :

" मिड्वेस्टमधील एका औषधविक्रेत्याच्या वखारींतून चोरांनीं १०,००० डॉलर्सचा माल लांबविला. चोरीचा एकंदर तपशील जुळवीत असतां हिशोबतपासनिसांना 'किरकोळ' गल्ल्यांतील ५३,००० डॉलर्सची अफरातफर झाल्याचें आढळलें! १८ वर्षें इमानी व आदर्श म्हणून मानलेल्या एका दुय्यम खजिनदार कारकुनानें ही उचापत केलेली होती. याच तऱ्हेनें गेल्या वर्षी ह्या निःशस्त्र लफंग्यांनीं १० कोटि डॉलर्सची अफरातफर वांकडे व्यवहार, खोटीं कागदपत्रें आणि बारीक चोऱ्या यांच्या द्वारें अमेरिकेंत केली. अप्रामाणिक कारकुनांनीं चोरलेल्या पैशाची व मालाची किंमत १९४७ सालापेक्षां आज ५० टक्के वाढली आहे! वैयक्तिक लफंगेगिरीचीं उदाहरणें तर आश्चर्यकारक आहेत. एका बँकेच्या ३० वर्षें विश्वासूपणें काम केलेल्या अधिकाऱ्यानें ५॥ लक्ष डॉलर्सची उचल केल्याचें निदर्शनास आलें आहे, त्याच शहरांतील एका बँकेच्या नव्या अध्यक्षांना ६ लक्ष ६० हजार डॉलर्सची अफरातर करतांना पकडण्यांत आलें! पण प्रत्यक्ष कॅशबॉक्सशीं संबंध नसतांहि अशा भयंकर उचापती केल्याचीं उदाहरणेंहि आहेत. एका जळाऊ तेलाच्या कंपनींतील नोकरांनीं १० लक्ष डॉलर्सचें तेल चोरलें! सरकारी खात्याच्या एका स्टोअर-हौसमधील ट्रान्सफर-क्लार्कनें व स्टोअर-क्लार्कनें २॥ लक्ष डॉलर्सचा माल उचलला. रेल्वेंतील सात असामी आणि रेल्वेपोलिसांचा एक फौजदार यांनीं मिळून चोरलेल्या पितळेच्या मोडीची किंमत ६॥ लक्ष डॉलर्स होती.

" सरकारी खात्यांतील स्टोअरहौसमध्यें 'इन्व्हेन्टरी श्रिंकेज' च्या नांवाखालीं १८ लक्षांचें नुकसान होतें. त्यांतील मोठा भाग चोरीमुळेंच होतो. मोठमोठ्या दुकानांतील मुनीम, खजिनदार, वखारींवरचे कामगार आणि हमाल यांच्या १५० चोऱ्या एका आठवड्यांत पकडल्या गेल्या. बनावटी रीफंडच्या केसेस तर एका दिवसांत २५ पकडल्या. एका सिनेमाच्या कॅशरनें व तिकिट-कलेक्टरनें दर आठवड्याला १ हजार डॉलर्स याप्रमाणें अनेक आठवडे उचलेगिरी चालविली. इन्शुअरन्स कंपन्यांतील लोकहि लॅप्स झालेल्या पॉलिसीवर पैसे देत राहतात आणि मृत्यूच्या बनावट केसेस करून पैसे उकळतात.

" या प्रकारांची कारणमीमांसाहि उद्बोधक होईल. 'चिकागो गुन्हेगारी-तपास-समिती' च्या इतिवृत्तामध्यें (त्या वृत्तान्ताचें नांव 'Why Honest People Steal' असें आहे) पुढील कारणें मुख्यतः दिलेलीं आहेत : (१) जुगार (२) ऐपतीबाहेर खर्चिक राहणी, (३) वाईट संगत (४) कमी मिळकत. याच संबंधांत नॅशनल अन्डररायटर कंपनीचे उपाध्यक्ष राल्फ ई. रिचमन् यांनीं चलन-वाढ व आर्थिक फुगवटा यांना दोष दिला आहे. ते म्हणतात, 'मालाच्या किंमती आणि कर यांमध्यें होणारी अभूतपूर्व वाढ अशी आहे कीं, त्यामुळें पगार मिळण्यापूर्वीच तो खर्च होऊन जाण्याची वेळ किस्येक लोकांवर येते.'

## अननसाची कथा

मॉडर्न रिव्ह्यूच्या नोव्हेंबर १९५१ च्या अंका-वरून अननसाविषयींची पुढील माहिती संग्रहीत केली आहे :

अननसाची धंद्याच्या दृष्टीनें वाढ फार झपाट्यानें होत गेली आहे. हें फळ कोलंबसाला अमेरिकेच्या शोधाच्या वेळीं Gua delo upe नांवाच्या बेटावर प्रथम दिसलें व नंतर वेस्ट-इंडीजमधील बेटांवरहि आढळलें. त्यानंतर हें फळ लोकांना इतकें आवडलें कीं, त्यांनीं तें जुन्या जगांतील बऱ्याच उष्णकटिबंधीय प्रदेशांत नेलें व तेथें लोकप्रिय केलें. या फळाच्या आपणांला माहीत असलेल्या जाती माणसानें लागवड करून वाढविलेल्या आहेत. परंतु त्याच्या जंगली जातीहि ब्राझिलच्या जंगलांत व पहाडांत अजून आढळतात.

हिंदुस्थानांत अननस सन १५४८ सालीं माहीत होता असें वर्णन आढळतें. बहुधा पोर्तुगीज प्रवाश्यां-नीं त्याची दक्षिण हिंदुस्थानांत प्रथम लागवड केली असावी. दक्षिण आफ्रिकेमध्यें त्याचा प्रवेश १६५५ त, क्वीन्सलॅन्डमध्यें १८५४ त आणि सिंगापुरांत नंतर केव्हां तरी झाला.








हवाई बेटें म्हणजे 'अननसाचें नंदनवन' समजलें जातें. तेथें ९०,००० एकर जमीन अननसाच्या लागवडीसाठीं वापरली जाते. हिंदुस्थानांत फक्त २५०० एकर जमीनच यासाठीं वापरण्यांत येते आणि त्यांतील ६० एकरांएवढीच मुंबई प्रांतांत !

'अनानास' हें नांव Guarani रेड इंडिअन लोकांनीं दिलेलें आहे. त्यांतील 'अ' म्हणजे 'फळ' आणि 'नाना' म्हणजे 'उत्कृष्ट'. हें मूळचें परागंदे देशांतील नांव सर्व जगभर माहीत झालें आहे.

याच्या अनेक जातींपैकीं Smooth Cayenne नामक जात हवाई बेटांत पिकते. सीलोनमध्यें हीच जात तयार होते व तेथें तिला (हवाई बेटांतील 'क्यू' या लागवडीच्या ठिकाणावरून) 'क्यूचा राक्षस' म्हणतात. सरासरीनें या फळाचें वजन ५ पौंड असते, पण या राक्षसी 'क्यू' अननसाचें वजन २० पौंडापर्यंतहि असतें. हिंदुस्थानांत मात्र हलक्या बारीक अननसांचीच लागवड होते.

अननसाचा मुख्य उपयोग खाण्याकडेच होतो. यंत्रांनीं फळाच्या चकत्या कापल्या जातात, साखरेचा पाक त्यांवर घातला जातो, उष्णता दिली जाते. सर्व कांहीं यंत्रांनीं होतें. मधला व बाहेरचा भाग पिळून त्यांतून रस काढतात व तो पॅकबंद करून खाद्यपदार्थ म्हणून विकतात. उरलेला चिपाडांचा भाग गिरण्यांत जाऊन तेथें त्यांपासून साखर व पॉवर अल्कोहोल तयार होतो. कित्येक हजार पौंड सायट्रिक ॲसिड, तसेंच कॅल्शिअम सायट्रेट व व्हिनेगार हे पदार्थ त्यांतून निघतात. बाकीचा भाग पेंड म्हणून ढोरांना खाऊं घालतात. अननसाच्या पानांतील तंतूंपासून Pina नांवाचें मूल्यवान् कापड तयार होतें. फिलिपाइन्स बेटें, फोर्मोसा व चीन यांत त्याचा वापर फार होतो. हिंदुस्थानांत चांभाराच्या धंद्याला लागणारा दोरा किंवा मणी ओवायला लागणारा दोरा यांपासून तयार करतात.

---

# त री हि—

या मशिदीच्या आवारांत क्षितिजाकडे टक लावून मी उभा आहे.

दुपार आहे. आकाश स्वच्छ आहे. प्रकाश शुद्ध आहे. पृथ्वी प्रकाशली आहे. ऊन तीव्र आहे.

अन् मी तुझी प्रतीक्षा करीत आहे. कदाचित् हांसत असशील तूं मला ! खरंच !

नद्या दुथडी वाहत आहेत. हिरव्याचार पाण्यानें सरोवरें तुडुंब भरलीं आहेत. तरीहि मी एक इवलीशी पणती त्याच सरोवरांतील पाण्यानें भरून ठेवली आहे !

खरंच हंसशीलच तूं !

तरीहि एखादी तहानेलेली चिमुकली चिमणी त्या पणतीच्या कडेवर येऊन बसली आणि आपला चानुला जीव ओणवून तिनें त्या पणतींतील पाण्यांत नुसती चोंच बुडविली कीं मला किती समाधान वाटतं...!

—इसबार अ. पठाण








अनुक्रमणिका








## वि क्री स त या र !



अनुक्रमणिका





